# मौन मनाच्या नंदनवनात



श्री सिद्धेश्वर स्वामीजी

# "मौन मनाच्या नंदनवनात"

प॥ पु॥ श्री सिद्धेश्वर स्वामीजी
श्री ज्ञानयोगाश्रम बिजापुर यांच्या

## "The Songs Of Silence"

या काव्यसंग्रहाचा भावार्थ अनुवाद

★ अनुवादक ★

ब्रिजलाल बालकीसन भुतडा
बिजापुर (कर्नाटक)

Songs of Silence या काव्यसंग्रहाचे मूळ रचयिता :
प.पु.श्री सिद्धेश्वर सवामीजी, ज्ञानयोगाश्रम, बिजापुर
''मौन मनाच्या नंदनवनात'' या शीर्षकांतर्गत त्याचा अनुवाद,

अनुवादक : © ब्रिजलाल बालकिसन भुतडा बिजापुर

प्रकाशक : सौ. शांताबाई नारायणदास चांडक, कराड.

प्रथम आवृत्ती : १९९९

मुल्य रूपये : ७५/- फक्त

मुखपृष्ठावरील छायाचित्र : सचिन शहा.

मुद्रण शुल्क सेवा : सौ.शांताबाई नारायणदास चांडक
६६-ब, सोमवार पेठ, कराड

मुद्रक : प्रिन्ट ओम ऑफसेट
२६९, ब/२ दौलतनगर, सातारा.
फोन : ३४०४९/३२०८२

अक्षररचना : टाईप इनोव्हेटर्स
१९५, सदाशिव पेठ, सातारा
फोन : ३४३७२

ज्यानी आमच्या कुटुंबीयावर
अपार मायेचा, ममतेचा व
आशीर्वादाचा अखंड वर्षाव केला
ते माझे

**वडील - पु.स्व.बालकिनजी भुतडा**
व
**आई - प.पु.स्व.चंद्राबाई बा. भुतडा,**
बिजापूर

यांच्या पवित्र पुण्य स्मृतीस या
काव्यसंग्रहाची मुद्रण शुल्क सेवा
अत्यादरपूर्वक अर्पण.

**सौ.शांताबाई नारायणदास चांडक,**
कराड

# स्वागत कवितेचे

पूज्य श्री. सिद्धेश्वर स्वामीजी यांच्या 'Songs of Silence' या काव्यसंग्रहांतल्या कविता भावनेनं आणि तत्त्वविचारानं ओथंबलेल्या आहेत. स्वामीजींच्या चिंतनाचा प्रदेश जितका व्यापक तितकाच खोल आहे. त्यामुळं या कविता वाचताना बुद्धीला व मनाला अेक अननुभूत स्वरूपाचा आनंद मिळतो. लाटांनी अुचंबळत असलेला समुद्र पाहताना किंवा चांदण्यांनी भरलेलं आकाश पाहाताना जसा आनंद होतो - तसाच अुत्फुल्ल आनंद रसिकाच्या मनाला या कविता देऊ शकतात. आनंद म्हणजे केवळ सुख नव्हे. अेक प्रकारची नवी वैचारिक आणि भावनिक जागृती अनुभवण्याला मी आनंद ही संज्ञा देतो. स्वामीजींच्या कविता म्हणजे त्यांच्या बुद्धीची विलसितं नव्हेत. त्यांचे शब्द ही नव्हेत. या कवितांनी त्यांच्या अंत:करणाचे उद्‌गार शोषून घेतले आहेत. हे अंत:करण एका भावसंपन्न, तत्वान्वेषी तपस्व्याचे आहे. त्यामुळं या कविता रसिकाला त्याच्या सामान्य, व्यावहारिक जीवनातून अुच्चतर विचारांच्या उंचीवर नेऊ शकतात. काव्य हा शब्दांचा खेळ नव्हे. बुद्धीची क्रीडा नव्हे. मनाला घडवणारी आणि आत्म्याला जागृत करणारी ती एक शक्ती आहे. उत्तम कविता रसिकाला संस्कारित करते. या दृष्टींन पाहिल्यास 'Songs of Silence' "मौन मनाच्या नंदनवनात" जो आपल्या मनात घोळवील त्याला तत्वार्थांची, जीवन-चिंतनाची नवी पहाट भेटल्याशिवाय राहाणार नाही.

श्री. ब्रिजलाल बालकिसन भुतडा या तत्वजिज्ञासु काव्यप्रेमी रसिकानं आंतरिक ऊर्मीनं स्वामीजींच्या इंग्रजी कवितांच सुरस मराठीत भाषांतर केलं आहे. हे भाषांतर वाचताना मनाला एकप्रकारची प्रसन्नता वाटत राहाते. कवितेचा अनुवाद करणं ही वस्तुत: कठीण गोष्ट आहे. अनुवाद करण्यासाठी भाषा प्रभुत्व, रचनासौकार्य इत्यादी गुण तर आवश्यकच असतात पण काव्याचा अनुवाद करण्यासाठी कवींच अंत:करण हवं असतं. स्वीमीजींच्या कविता अनुवादित करायच्या तर त्यांच्या विचारांशी, भावभावनेशी सहकंप पावणारं मन प्रथम अनुवादकापाशी असलं पाहिजे. श्री.ब्रिजलाल भुतडा यांच्याजवळ ही सर्व सामग्री निश्चितपणानं आहे याची जाणीव त्यांचा हा रसमय अनुवाद वाचताना होते. जे मूळ कवीच्या अंतरंगात आहे त्याचा संवेद्य वृत्तीनं अनुभव घेऊन मग ते मराठीत रूपांतरित करण्याची कलात्मक धडपड या अनुवादात दिसते. शब्दाला शब्द ठेवला म्हणजे भाषांतर झाले असं काही

जणांना वाटतं. पण काव्यासारखी कलाकृती दुसऱ्या भाषेत साकार करताना त्या कवितेच्या मुळाशी असलेल्या भावतरंगापर्यंत हळुवार मनानं अनुवादकाला जावं लागतं. कोर्टातल्या एखाद्या निकालपत्राचं भाषांतर आणि रससिद्ध कवीच्या व विचारवंताच्या गूढ शब्दांचं भाषांतर यात प्रचंड अंतर आहे. माझ्या मते भाषांतरापेक्षा मूळ कवीच्या हार्दिक स्पंदनातील सुंदरता आणि विचारशीलता आपल्या शब्दांत सहजतेनं व्यक्त करणं हेच अनुवादाचं यश आहे.

श्री. ब्रिजलालजी भुतडा यांनी 'Songs Of Silence' हे काव्य आपल्या बुद्धीत आणि मनात जणू रुजवलं आहे-स्वामीजींच्या विचारांचं त्यांनी परिपक्व मनानं रसग्रहण केलेलं असल्यामुळं या काव्या चा अनुवाद प्रत्ययकारी व्हावा यात आश्चर्य नाही. अनुवाद ही यांत्रिक प्रक्रिया नाही. तिच्यात अनुवादकाला आपल्या साऱ्या मानसिक शक्ती वेचाव्या लागतात. मूळ काव्यकृती आत्मसात् व्हावी लागते. श्री.ब्रिजलालजी हे स्वामीजींच्या काव्याचे नुसते वाचक नाहीत ते उपासकहीआहेत. उपासना करणाऱ्या भक्ताला दैवीकृपा अनुभवता येते. प्रत्येक कवितेतील आशय त्याच्या सर्व संदर्भासह सुस्पष्ट व्हावा, त्याचा अनुवाद काव्यदृष्ट्या अर्थपूर्ण व्हावा यासाठी त्यांनी कित्येक महिने परिश्रम घेतले आहेत. याचा अर्थ स्वामीजींची कविता त्यांनी आपल्या मनाच्या भूमीत जोपासली. तिच्यातला रस आणि त्या संगमातून उत्पन्न झालेलं हे मराठी काव्यरसायन त्यांनी रसिकांसमोर ठेवलं आहे. खरं तर स्वामी सिद्धेश्वरांची विचारगर्भ कविता अनुवादित करणं हे एक साहस आहे. पण त्या कवितेचं आव्हान अनुवादकानं योग्य रीतीनं पेलून त्या इंग्रजी काव्यफुलांना मराठी भावसुगंध दिला याबद्दल श्री.ब्रिजलालजी यांचं एक वाचक या नात्यानं मी मन:पूर्वक अभिनंदन करतो. या कविता आध्यात्मिक आहेत पण त्या बरोबरच त्या लौकिक जीवनासंबंधीच्याही आहेत. अध्यात्म हे लौकिकाला सोडून असत नाही. ज्या जगात आपण राहतो, जे नाना प्रकारचे सुखदु:ख मिश्रित अनुभव घेतो, सृष्टींच निरीक्षण करतो, माणसांच्या वृत्तीप्रवृत्ती न्याहाळतो, त्याच चिंतन करणं व त्यामागं असलेल्या तत्वांचा शोध घेणं आणि साऱ्या सृष्टीत एकच तत्व भरून उरलं आहे हे जाणणं व अनुभवणं यालाच आध्यात्म म्हणतात. प्रगल्भ मन अध्यात्माकडं झुकतं. अनुवादकाच्या पक्व आणि प्रौढ मनानं स्वामीजींच्या कवितेतून त्यांच्या अंत:करणाशी जो 'संवाद' केला त्यातून ही 'शांतीची गीते' किंवा 'नीरवतेची गाणी' निर्माण झाली आहेत. अनुवादकाच्या कौशल्याची अनेक उदाहरणे देता येतील.

'Sick Mind' या कवितेत स्वामीजी म्हणतात,

What ails me?
Mind is heavy;
Heart is loose
Thought-flow is strangled
Dejection has taken its seat
Wherein happiness should be throned.

या ओळींचं भाषांतर श्री. ब्रिजलालजी यांनी कसं सहजतेने केलं हे पाहण्या-सारखं आहे.

'कशामुळं आहे मी अस्वस्थ?'
माझा मलाच करतोय मी प्रश्न!
मन जड झालंय
खिळखिळं झालय काळीज
थोपली गेलीय विचारधारा.
ज्या हृदय सिंहासनावर बसून
राज्य करायचं सौख्यानं
ते बळकावलंय औदासीन्यानं!

मूळ कवीचं अस्वस्थ, अशांत मन अनुवादकाच्या-मनोवृत्तीत मुरल्याशिवाय अस्वस्थतेचा वेध घेता येणार नाही. -अनुवादक श्री.ब्रिजलालजी स्वत:च त्या मानसिक अवस्थेचा अनुभव घेत आहेत ही जाणीव या भाषांतरातून होते. भाषांतर हे माझ्या दृष्टींन हृदयांतर आहे. 'ये हृदयीचे ते हृदयी घातले' ही भावावस्था सुरस अनुवादाला आवश्यक असते. श्री.ब्रिजलालजी हे स्वत: तत्वाचा शोध घेवू इच्छिणारे एक चिंतक आहेत. स्वामींजीची तत्वसुंदर व्याख्यानं ऐकून आणि त्यांच्या आशयसंपन्न कविता पुन्हापुन्हा वाचून त्यांच्या मनाची एक विशिष्ट ठेवण बनली आहे. जीवनात प्रेयही असते आणि श्रेयही असते. बहुसंख्य माणसं श्रेयाकडं दुर्लक्ष करतात. किंबहुना श्रेयस्कर असं काही असतं याची त्यांना कल्पनाही नसते. आहार,निद्रा,भय इत्यादी शारीरिक गरजांच्या पलीकडं त्यांच मन जात नाही. भौतिक सुखदु:खांच्या कोषातच माणसं सुरवटांप्रमाणं बसून राहिलेली असतात. कोष फोडून बाहेर यावं आणि विशालतेचं, भव्यतेचं दर्शन घ्यावं, स्वत:संबंधी व विश्वासंबंधी खोल विचार करावा असं ज्यांना वाटत त्यांच्या नि:शब्द मनांतच काही गीतं जुळून येतात. कशामुळं आहे मी अस्वस्थ? हा प्रश्न पडणं हे देखील परिणत बुद्धीचं लक्षण मानलं पाहिजे. मी कोण आहे? मी कुठून आलो? मी अनुभवीत असलेल्या सुखदु:खांचा अर्थ काय? असले प्रश्न कांचनमृगासारखे हुलकावणी देत राहतात. त्यांची उत्तर लवकर सापडत नाहीत. पण तत्वजिज्ञासु व्यक्ती मात्र या प्रकारच्या प्रश्नांचा पाठलाग करीतच राहतात. जे माहीत नाही ते अवगत करून घ्यावं यातला आनंद त्यांना मिळवावासा वाटतो.व्यवहारदृष्ट्या शहाणी माणसं मूलभूत प्रश्नांना भिडत नाहीत. पण ज्यांना परम अर्थाचा शोध आवश्यक वाटतो - त्यांच्या अस्वस्थ मनोवृत्तीला मी तरी एक वरदान मानतो. आपलं जगणं अधिकाधिक विकसित व्हावं, त्या जगण्यातल्या आनंदाला आणि वेदनेला अर्थ यावा म्हणून चिंतनशील वृत्तीच्या व्यक्ती जीवनाचा शोध करतात. शोध करताना अस्वस्थही होतात. अनुवादक श्री.ब्रिजलालजी पुढं म्हणतात,

मनाच्या तावदानातून
दिसणारे हे हिवाळी आकाश
जणू ताज्या वाऱ्यामुळं
तरतरी आल्याप्रमाणं
निरभ्र नि गर्द निळं
दिसत असलं तरी
औदासीन्याचे घनदाट काळे ढग
भासतायत आतल्या आत विखुरलेले !

कवी, संत, तत्वचिंतक-अंतर्मुख वृत्तीचे असतात. त्यांचा संवाद समाजाशी तर चालतोच पण स्वत:शी अधिकांशानं चालतो. आपल्या अंतर्मनात खोलवर डोकावून पाहाण्याची त्यांना सवय असते. आपण एकाकी आहोत. उदास आहोत याचे त्यांना भान असते.

कवितेनं बुद्धीला झुलवण्यापेक्षा मनाच्या खोल तळाशी सुप्तावस्थेत असलेल्या विचारांच्या ठिणग्या पेटवाव्यात अशी ज्यांची प्रगल्भ अपेक्षा आहे त्या वाचकांना हा काव्यसंग्रह चिंतनीय वाटत राहील. कारण या काव्यसंग्रहाला व्यापक तत्वविचारांचं अधिष्ठान आहे. 'Songs of Silence'चा अनुवाद करावा ही ओढ श्री. बिजलालजी यांच्या मनाला लागावी आणि त्यांनी परिश्रमपूर्वक रसमय अनुवाद सादर करावा ही आम्हा मराठी वाचकांच्या दृष्टीनं एक समाधान कारक घटना आहे.

अनुवादक श्री.बिजलालजी यांची वृत्ती कवीची आहे त्यामुळं स्वामीजींच्या काव्यांच काव्यरूप मराठी अनुवादातही ते कायम ठेवू शकले. चांगल्या काव्याचं कित्येक वेळां गद्यवजा रुक्ष भाषांतर केलं जातं तसा प्रकार इथ मात्र घडलेला नाही. 'काव्य घटनानुकूल शब्दार्थोपस्थिति :' कवितेला अनुरूप व अन्वर्थक अशा शब्दांची निवड करणारी एक सहज शक्ती असते तिचं अस्तित्व श्री.बिजलालजी यांच्या विवेचक बुद्धीत आहे. स्वामींजीची मूळ कविता अनेक संदर्भांचे सूचन करीत असते. ते संदर्भ आपल्या मराठी शब्दातूनही सूचित व्हावेत ही दक्षता त्यांनी घेतलेली आहे. Grey Hair, 'कथा नि व्यथा पांढऱ्या केसांची ' ही कविता उदाहरणादाखल पहावी.

Youth dances
To the tune of lust and love
His hair giggle
And tell the tales
of valour !
They flow in air
And lift the feelings
To the heights

Of lovely-Heaven
Crystle dark
They swim over
The timeless time

या काव्यपंक्तीचा अनुवाद नाट्यपूर्ण शब्दांतून झाला आहे.

तरूण नाचतो तरातरा
वासनेच्या अन् प्रेमाच्या तालावर
हसतात त्याचे केस फिदीफिदी;
ऐकवतात कहाण्या मर्दुमकीच्या..
भिरभिरतात हवेत
भावनांना हेलावून
ठेवतात नेऊन
स्वर्गाच्या उंचीवर
काळया स्फटिकाप्रमाणे चमकणारे त्याचे केस
भटकत राहतात काळातीत काळात

सारांश अनुवादित कवितांचा हा एक प्रत्ययकारी संग्रह रसज्ञांच्या समोर येत आहे. यातल्या कविता म्हणजे चिंतन,अनुभूती यांचा अर्क आहे. कविमनाच्या भूमीवर अनुभवाचे काही थेंब पडत असतात. संवेदनाशील भूमी त्या थेंबांचा ओलावा शोषून घेते आणि कवीच्या भावना अंकुरित करते. श्री.पूज्य सिद्धेश्वर स्वामीजी यांच्या फुलून आलेल्या भावविचारांना अर्थपूर्ण मराठी रूप श्री.ब्रिजलालजी यांनी दिलं त्यामुळं मराठी काव्यसाहित्यात एक चांगली भर पडली यात शंका नाही.

खरं तर उत्तम कवितेला कोणत्याही प्रास्ताविक शब्दांची आवश्यकता नसते, कविता आणि रसिक यांच्यात प्रस्तावनेचं रसविघ्न उभं करू नये या मताचा मी आहे. पण अनुवादकर्ते श्री.ब्रिजलालजी भुतडा यांचा आग्रह व माझीही अनावर ईच्छा यामुळे या विचारसुंदर काव्याला एक गद्यवजा ठिगळ मी जोडलेलं आहे. या चांगल्या कवितेच्या सान्निध्यात काही काळ राहण्याची संधी मिळाली, याबद्दल त्यांचे आभार मानतो. मराठी रसिक "मौन मनाच्या नंदनवनातील गीत" आनंदानं स्वीकारतील यात संशय नाही.

-निर्मलकुमार फडकुले
सोलापूर

□

# अमृतकुंभातले काही अमृतबिंदू

या कविता म्हणजे स्वामीजी मौन स्थितीत असतानां त्यांच्या दिव्यानुभानें पाझरलेले आध्यात्मिकेतचं रूप ल्यालेले व गूढार्थाच्या वलयांनं वेष्ठीलेले अमृतबिंदू आहेत. म्हणूनच पु.स्वामार्जींनी त्या काव्यसंग्रहास Songs of Silence हे सार्थ नाव दिले आहे. त्या अमृतबिंदूतील काही कण मला जे विशेष भावले ते अनुवादासह उद्‌धृत करीत आहे.

All rejoicing,
The man lighted the lamp
In worship, in memory
Of his search !
Of his finding
या सर्व अनुभूतीच्या आनंदाचा आस्वाद घेत,
आतापर्यंत त्यानं चालविला होता जो शोध,
त्यातून त्याला जो झाला होता बोध,
त्या शोधाच्या नि झालेल्या बोधाच्या
आठवणीप्रीत्यर्थ, आराधना करण्यासाठी
त्यानं तेवला एक नंदादीप ! *(क.क्र ५)*

Not a ray of hope, there is
To know the ray of light.
प्रकाशाचे किरण म्हणजे
असावे की बाही,
नक्की जाणू म्हणावे तर,
आशेचा एकही किरण नाही. *(क.क्र.६)*

He zooms to the Moon !
Stands on the dust
With all glee on his face
Though he finds there
Not a trace of water or air
He fails not to dine
The dishes of daring Pleasures.
Kicks behind
The pull of Earth
Sways with full swing
In the space so void
The sence of adventure
solidified
Is the man, the event of evolution.
नाही तिथं पाणी, नाही हवा;
हे माहीत आहे त्याला
तरी तो चुकत नाही
साहसानंदाने भरलेल्या ताटावर
ताव मारायला !
पृथ्वीच्या गुरूत्वाकर्षणाला
लाथाडून मागे सारणारा,
अवकाशाच्या महान पोकळीत
पुऱ्या जोमानं मनमुराद झोके घेणारा,
साहसाच्या प्रज्ञेवर शिक्कामोर्तब करणारा,
असा हा माणूस-
जीवोत्क्रांतीतत्वाचा इत्यर्थ । *(कं.क्र.१६)*

Man forgot the strategy
of his own mind;
Instead of enjoying them
as tales to be heard,
He set them as his
goals to be achieved
or avoided.
The mind fooled the man;
Man served the mind !

माणसाला विसर पडतो
स्वत:च्या मनाच्या डावाचा;
केवळ मनरंजनाकरिता
ऐकायच्या या कथा.
पण असं न मानता
तो मानतो त्यानांच प्रमाण,
साध्य उद्दीष्टांचं
किंवा वर्ज्य गोष्टींच !
माणसाच मनच
त्याला बनवित मूर्ख;
नि माणूस करतो मनापासून
मनाची सेवा ! *(क.क्र.१९)*

Man with
Night in heart,
Light in head,
This godly beast
Walks on the earth
माणूस हा असा
डोक्यात उजाळा दिवसाचा,
काळजात रात्र काळी
देवत्वाचं सोगं पांघरलेला,
पृथ्वीवर बिनधोक वांवरणारा,
शहाजोग जंगली पशू ! *(क.क्र.१९)*

Flood,famines and heat waves
Have ever been after his life,
He has breasting valour;
On his own death repeated
He is thriving !
कराल दुष्काळ नि महापुराचे आघात,
आग ओकणारे उष्माघात,
कायमचे त्याच्या पांचवीला पूजलेले !
पण निधडया छातीचा हा माणूस
स्वत:वर वारंवार चाल करून,
येणाऱ्या मृत्युला पुरून उरतो !
नि रसरशीत जीवन जोमाने जग तो !! *(क.क्र.२३)*

He knows much
To feel that he knows nothing!
त्याला कशाचंच ज्ञान नाही-
याची जाणीव होण्या इतपत,
भरपूर ज्ञान आहे त्याला !! (क.क्र.२६)

Life is all sweet, honey & milk
sparkling water
To the thirsty !
Not God,But
They seek each other;
Heaven lies around them !
Chirping Singing
And Carolling
They bring joy
These two Angels
दुधासारखं, मधासारखं,
त्याचं जीवन गोड अजोड
जसं तहानलेल्याला असते,
पिण्याच्या पाण्याची ओढ.
जीव टाकतात एकमेकावर;
देवाचाही त्याना पडतो विसर;
स्वर्ग तर त्याना
दोनच बोटे वर
किलबिलत गुणगुणत खिदळत
भरते 'जीवनात' गोडी-
ही देव दूतांची जोडी! (क.क्र.२८)

Innocence all drained out.
Hatred & fire
Fills the nerves:
The dragon ridden
The mankind dances
The dance of death
The world burns; the soul simmers
when he, the SATAN,fiddles.

सरलता नि निरागसता,
कुठल्या कुठं जातात निघून,
नसा नसात भरून जातो,
त्वेषयुक्त,द्वेष
नि लाही करणारा जळफळाट
अति निर्दय नि क्रूर पशूचा अवतार
हा क्रोध....
मानवतेच्या छाताडावर
तांडव नृत्य करतो
माणसाचं माणूसपणच हिरावून नेतो
सारं जग पेटलेलं, जीवांचा थरकाप-
अन् हा मूर्तिमंत सैतान,
बेमुर्वतपणे बसलेला-
सारंगी छेडीत ! (क.क्र.३२)

His look wards
The evils of cares
त्याच्या सुखद दर्शनानं
काळजीची काजळी
जाते झडून काळजातून.

He is dead
To be alive forever
Drinking the cosmic
Ambrosia
रजनीकांतानं पाझरलेलं
ब्रम्हांडातलं दिव्यामृत प्राशन करून
चिरंजीव होण्याच्या निश्चयात
आपल्याच तंद्रीत निश्चल स्थितीत आहे तो। (क.क्र.३३)

Sleep, you the Sweeter death
Touch the lips
Ever on my lids & eyes close !
The soul will be freed

निद्रादेवी तू मरणातलेही
भावणारे मरण
तुझे मायावी ओठ
माझ्या पापण्याना स्पर्श करताच
डोळ्याना येते झापड.
ब्रह्मानंदी लागते टाळी ।
नि जीवात्मा होतो बंध मुक्त !! (क.क्र.३६)

Modern giant
often a servent of man
May sometimes
change into a Devil
The killer;
Then it strangles
mankind
Burns this green planet
to brown ashes
And goes forever dead !
आधुनिक सैतान
मानवाच्या कल्पनाशक्तींनं
निर्माण झालेलं यंत्र
केव्हा केव्हा धारण करतं
रूप भस्मासुराचं !
उध्वस्त करून टाकत जीवन, मानवाचं !
जळून करत बेचिराख
निसर्गानं नटलेल्या वसुंधरेला
नि घाला घालून स्वतःवर
घडवून आणतं स्वतःचाच अंत! (क.क्र.४२)

God, your finest creation
This friendship is in your noble imitation !
हे प्रभो तू निर्मिलेल्या जगातील
तुझी सर्वोत्कृष्टकृती
ही निर्हेतुक मैत्री म्हणजे
साक्षात् तुझीच प्रतिकृती । (क.क्र.४७)

Smile in life blooms
While there is milk in thy cup!
जोवर तुमचं ताट अन्नानं असतं भरलेलं
तोवर तुमचं जीवन असतं फुललेलं। (क.क्र.६५)

It is slippery, moss clad
A step on it.
Hellish-fall is the fate.
सुखाला असते शेवाळाची घसरण
पडलं रे पडलं एक पाऊल त्याच्यावर
तर होते माणसाची गत
नरकात पडल्यागत !! (क.क्र.७५)

Hence peep never,
If you want to have this world
All pleasent forever.
नेहमीच सुंदर दिसावं हे जग
असं वाटत असेल मनापासून
तर पडू नये माणसानं,
डोकावण्याच्या नसत्या भानगडीत ! (क.क्र.८१)

Wind arrows across,
Leaves fall in yellow
Branches barren
Lie in hibernation.
सूंसूं करीत वाहतोय वारा;
पिवळ्या पानांचा पाचोळा साठवत;
नि हिवाळा संपण्याच्या प्रतिक्षेत
बसलेत झाडांचे सांगाडे विसावत ! (क.क्र.८३)

Here the fisherman
Buckets fishes,
To feed the holy souls
of this city

with the holy food
Grown under
The loving care of the Goddess.
पुज्य गंगामातेच्या
ममतेच्या छत्रछायेखाली-
पोसलेले गुबगुबीत मासे-
पकडतायत ते धीवर.
टोपल्या भर भरून,
ह्या पुण्यनगरीतील पुण्यात्म्यांना-
ह्या पावन माशांच्या-
पवित्र अन्नांनं पोसून,
पुण्य पदरी पाडून घेण्याकरीता !! (क.क्र.८७)

Love loves to be loved
And to be no-more.
प्रीतीला वाटतं मनापासून
की कुणीतरी करावी आपल्यावर
भरभरून प्रीती
नि मंग होऊन जाव आपण
शून्यात विलीन !! (क.क्र.८८)

But What is all this?
And in darkness I am sailing.
I know but what?
काय असावं बरं हे सारं ?
विचार करता मनीं
मिळेना धागा कुठं मला
अंधारात चाचपडतो मी !
वाटतं मला आहे ज्ञान ''साऱ्याच''
पण ''सारं'' म्हणजे कशाच?
माझं मलाच राहिलय कोडं याचं ! (क.क्र.९२)
I grew
And filled
The space to its end.

All went dead.
I lived alone !
Alone forever !
Sailed my "I"
In the Blue sea of my being.
मनानंच मी गेलो वाढत नि पसरत,
नि संपूर्ण अवकाशाला टाकलं घेरून !
सर्व स्थिरस्थावर-हालचाल रहीत!
मी जगत होतो एकटाच, जागृत राहून-
केवळ एकला एकसारखा !
माझ्या अस्तित्वाच्या महासागरात
विहरत होता माझा ''अहं''. *(क.क्र.१०२)*
Religion is a relation with the universe:
It is a sweet meeting
Of the atom
With the Boundless
Of the soul
With the Truth
Endless.
धर्म म्हणजे-
विश्वाशी असलेलं नातं.
एक घडून येणारं मधुर मीलन-
सुक्ष्माणूंच अमर्यादशी-
आत्म्याचं सत्याशी,
कधीही न संपणारं ! *(क.क्र.१०४)*



# मनोगत अनुवादकाचे

"Songs of Silence" या काव्यसंग्रहाची मूळ अमृततुल्य रचना परमपुज्य श्री सिद्धेश्वर स्वामीजी, ज्ञानयोगाश्रम, बिजापुर यांच्या अंत:प्रेरणेतून निर्माण झालेले आहे. अगदी ध्यानी मनी नसतानां, मूळ इंग्रजी काव्य संग्रह वाचल्यानंतर सहज वेळ जावा व काव्याचा आनंद लुटावा या ''स्वार्थी'' हेतूनें पहिल्या ४-५ कवनांचा अनुवाद केला. तो बऱ्यापैकी झाला असें वाटल्यामुळें पु।। स्वामीजीना दाखविला. ''श्री'' नी संपूर्ण काव्यसंग्रहाचा अनुवाद करायला स्फूर्ती दिली. त्यांच्या आशीर्वादानेंच हे धाडस केले. केलेला अनुवाद वाचून पाहता त्यात बऱ्याच सुधारणा करण्याची गरज मला भासली.अनेक बदलासह पुनर्लेखन केले आणि संत वाङमयाचे गाढे अभ्यासक, महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध विद्वान् वक्ते, सोलापुरचे प्रा.श्री.निर्मलकुमार फडकुले याना हस्तलिखित सुपूर्त केले व त्यांच्या अभिप्रायासह मौलिक सूचना करण्याची विनंती केली. प्रा.फडकुले महाराष्ट्रभर विविध विषयावर खास करून संत वाङमयावर व्याख्याने देण्यात सदैव इतके व्यस्त असतात की माझ्या विनंतीला होकार देणे त्याना शक्य होईल कि नाही याबद्दल मनात शंका होतीच. पण मूळ इंग्रजी काव्यसंग्रह वाचून त्याना इतका आनंद झाला की याचा अनुवाद ठीक व्हायला हवा, व तो तसा झाला की नाही हे पडताळण्याकरिताच कि काय त्यानी होकर दिला. माझ्या मनावरील भार पार निमाला. अनुवाद व्यवस्थित झाल्याची पावती त्यांच्या अभिप्रायरूपाने मिळाली. सदर अभिप्राय सुरवातीच्या पानावर आहे. त्यांचा मी ऋणी आहे. प्राथमिक लेखनाच्यावेळी,मूळचे बिजापुरचे व आता पुण्यात स्थाईक झालेले प्रा.श्रीहरी भिडे (रामायणातील शाप आणि वर या पुस्तकाचे लेखक) यानीही काही मौलिक सूचना केल्या त्या बऱ्याच उपयुक्त ठरल्या. त्यांचेही आभार मानणे माझे कर्तव्य आहे.

पु।। स्वामीजीनी प्रत्येक कवितेच्या मतितार्थाला त्या त्या कवितेच्या शेवटच्या ओळीत गूढार्थानेच गुलदस्त्यात ठेवले आहे. तो हुडकून काढण्याचे काम त्यानी वाचकावर सोपवून टाकले आहे. हीच तर या सबंध काव्यसंग्रहाची खासीयत आहे. अनुवाद करताना इंग्रजीभाषेत स्वामीजीना जे अभिप्रेत आहे ते मराठीत ठीक उतरविण्याकरीता काही ठिकाणी थोडे विस्ताराने लिहावे लागले. कवितांवर मराठी साज चढविण्याकरिता असे करणे भाग होते. पण गूढार्थ न उकलता तसाच ठेवण्याचा यशस्वी प्रयत्न करू शकलो याचे मला समाधा

आहे.उदाहरणार्थ The Bell ही त्यांची कविता (क्र:२९) आपल्या विशेष शैलीत पु॥ स्वामीजीनी घंटेचे वर्णन करून ही घंटा कोणती हे त्यानी शेवटी सांगितले आहे - "Every wrist carries a bell. This Bell carries him" ही घंटा कोणती हे वाचकानीच ओळखावे. ज्यांना शक्य आहे त्यानी स्वामीजींचा मूळ इंग्रजी काव्यसंग्रह जरूर वाचावा. अगदी साध्या भाषेत पण आशयाने परिपूर्ण व बहारदार आहे. त्याच बरोबर हा अनुवाद वाचून मूल्पमापन करावे. मूळ पुस्तक भारतीय विद्याभवन मुंबई या सुप्रसिद्ध मान्यवर प्रकाशन संस्थेने प्रकाशित केले आहे. वानगीदाखल पु॥ स्वामीजींचे इंग्रजीतील संक्षिप्त मनोगत व त्याचा अनुवाद पुढील पानावर पहावा.मूळचा माझा व्यवसाय-अन्नधान्य व्यापार व कारखानदारी. पाच पंचवीस कविता व "सकाळ" वृत्तपत्रात केंव्हातरी "वाचकांचा पत्रव्यवहार" यांत हजेरी हे माझे लेखन भांडवल. व्यवसायामुळे हातात लेखणी पण "लेखक" म्हणून आता एकाहत्तरीत आलो तरी तिचा (मनात खूप असूनही) कधीच वापर नाही. पु॥ स्वामींजीच्या सान्निध्याचा व त्यांच्याज्ञानप्रचुर-प्रवचनांच्या श्रवणाचा लाभ, या पार्श्वभूमीवर हा अनुवाद करण्याचे धाडस "श्रीं" च्या प्रोत्सहनानेच बहुतांशी यशस्वी रीत्या करू शकलो असे मला वाटते. पु॥ स्वामीजींचा परिचय थोडक्यात करून देणे ही एक अशक्यप्राय बाब आहे. तरीपण संक्षिप्तपणे "श्रीं" चा परिचय सदर पुस्तकाच्या मुखपृष्ठाच्या मागील बाजूस दिला आहे. लहानपणा पासून अध्यात्म विषयी गोडी. माझ्या पु. वडिलांचीही अशीच अध्यात्मिक वैचारीक बैठक. तशात पु सिध्देश्वरस्वामीजी सारखे साक्षात् परमेश्वर स्वरूप सद्गुरू लाभले हे माझे महद्भाग्य.

या पुस्तकछपाईची आर्थिक बाजु माझी बहीण सौ.शांताबाई नारायणदास चांडक, कराड हिने उत्स्फूर्तपणे स्वीकारली आहे. तिला धन्यवाद द्यावेत तितके थोडेच ! तिची ही सेवा आमच्या स्व.आई-वडिलांच्या पवित्र स्मृतीस अर्पण करण्याची तिची मनीषा दिसते. माझी नात कु.मंगल नारायणदास लढ्ढा, सोलापूर, हिने अंतिम हस्तलिखीत पूर्णपणे लिहून काढले त्याबद्दल तिचेही कौतुक करायला हवे.

मुद्रक श्री.संदेश शहा, सातारा यानी सुबक अक्षरात छापून पुस्तकास आकर्षक आकार दिला त्याबद्दल आभार मानतो. मुखपृष्ठावरील छायाचित्र पुस्तकाच्या शीर्षकाला शोभेलसे तयार करून दिल्याबद्दल श्री. सचिन शहा यांचे ही आभार मानतो.

हा अनुवाद पु॥ स्वामीजींच्या चरणकमली अत्यादराने अर्पण करतो.

**ब्रिजलाल बा.भुतडा**

बिजापुर



# अनुक्रमणिका

| अ.नं. | कवितेचे नांव | पान नं. |
|---|---|---|

# SONGS OF SILENCE

*These poems are the flowers*
*grown in the Garden of silence*
*May be, there is beauty in them*
*for your eyes to feast on*
*May be, there is fragrance*
*for your soul to revel in*
*Perchance,*
*in their depth is hidden*
*the nector of truth*
*spiritual in form*
*and mysterious in content.*

**SIDDHESHWAR SWAMIJI**



नीरव शांततेच्या फुलबागेत प्रसन्नतेनं
उमलून फुललीत ही काव्य सुमनं ।
कदाचित् येईल प्रचीती त्यांच्या सौंदर्याची
नि फिटेल तुमच्या डोळ्यांचं पारणं ॥

कदाचित् दंग होईल तुमचा अंतरात्मा,
त्यातल्या दिव्य सुगंधाच्या दरवळानं ॥

किंबहुना,

दडले असतील त्यांच्या खोल गाभ्यात
सत्याचे अमृतबिंदु सुयोगानं
अध्यात्मिकतेचे रूप ल्यालेले
नि वेष्ठिलेले गूढार्थाच्या वलयानं ॥

**सिद्धेश्वर स्वामीजी**



# १. "शून्य"

प्रकाश किरणावर एका होऊनीया स्वार
झेपावलो मी आकाशात
वेध घ्यावा नभोमंडळाचा,
अशी मनीषा बाळगून.
युगानु युगे सरलीत,
चालूच राहिलीय ही घोड दौड;
कुठं असावा हिचा अंतिम टप्पा
याचं राहिलंय मला अजूनी गूढ.

नाही उमगलं आजवर मला
माझ्या वाहनाचा वेग किती,
नाही लागला अंदाज आजवर
अंतर त्यानं कापलं किती ॥
अगणित तारे चमचमणारे,
होते भिरभिरत अवती भवती,
सूंऽ सूंऽ सूं चा नाद करीत
होतं ते फेऱ्या मारीत
गोल-गोल ब्रह्मांडा भोवती ॥
खोलाची खाई राहिली, वाढतच वाढत,
धावत होती अंतराळाची टोके, दूर विस्तारत ॥
काय बरं असावं हे
खोल खोल जाणारं
नि अनंत विस्तारत पसरणारं ?
शून्यच ते, फक्त "शून्य" ।

अनंत, अनादि पसरलेलं,
आहे त्याचं अस्तित्व,
शाश्वत स्थितीत राहिलेलं ॥
एक छोटासा भाग शून्यातला,
"ब्रह्मांड" म्हणून ओळखला जाणारा,
विस्तारलेलाय काळाच्या रुपात,
पसरलेलाय अवकाशाच्या स्वरुपात ॥
अमर्याद मध्येच वसलेलं, पण मर्यादित,
अमरसृष्टीतलं मर्त्य
अद्वैतामधलं बहुविधकारी
अद्‌भुत किती हे
विशाल आकाश तरी ? ।।
दृष्टी थेट त्याच्यावर
नाही पोंचू शकत;
हाती कुणाच्या कधी ते
नाही येऊ शकत ॥
बाह्य देखाव्यापासून दूर,
नि भौतिक सुखोपभोगापासून अलिप्त
हे आकाश
याचं प्रतिरुप, कसं करु शकेल प्रतिंबिंबित
खळखळणारं चंचल मानवी मन ?
बोध होतो माझ्या मनाला जेव्हा
कि शून्यातूनचं सगळं काही घडत असतं,
शून्याचं अस्तित्व
एकूण एक गोष्टीच्या बूडात असतं
तेव्हा ते थक्क होतं, भारावून जातं,
विस्मयसागरात डूंबून जातं ॥
वास्तविक -

अस्तित्वात राहतं फक्त ''शून्य'' ।
आपण जगत असतो शून्यातच,
गुरफटलेले राहतो पुरते, शून्यातच ।
या ''शुन्या''बद्दल आपलं ज्ञान ''शून्य'' ।
तरीही आपण स्वप्नसृष्टीत वावरत असतो,
कि शुन्याबद्दल थोडं तरी जाणतच असतो ।।

माणूस जेव्हा मिरवीत असतो
ज्ञानाचा टेंभा
सत्य हसत असतं
गालातल्या गालात ॥

❑ ❑

## २. ''अंतरीक्ष''

टवटवीत पुष्पाच्या रुपानं
प्रकृती फुलते अंतराळात खुल्या दिलानं,
प्रकृतीरुपी फुलाचा दरवळतो काळरुपी सुगंध
अंतरीक्षाच्या पोकळीत प्रकर्षानं ॥

अनंत अंतराळाच्या पटलावर
चालु असतं अखंड,-जीवाचं स्पंदन,
चालु असतो ताऱ्यांचा चमचमाट,
नि आकाशगंगेचा झगमगाट.
थवेच्या थवे चांदण्यांच्या दिव्य दीपांचे,
करत असतात घाई पोंचायची वर,
अंतहीन पोकळीच्या
कधीही न भेटणाऱ्या टोकावर !

दूर होते जीवसृष्टी,
तारे बनतात प्रकाशहीन;
गुरुत्वाकर्षित होते प्रकृती,
नि होते काळ्या पोकळीच्या स्वाधीन,
नि तिच्याभोवती पिंगा घालणारी
काळाची जाणीव
बोथट होत होत पावते लोप ॥

सगळंच निरर्थक,
निव्वळ पोकळी;
पोकळीचं दुसरं नांव "शून्य" !
शून्य म्हणजे साऱ्याचा अंत !!
अंत हेच अंतिम सत्य !!!

 

## ३. "नीलाकाश"

ईश्थर नावाच्या अमूर्त-
नि चवरहीत द्रव्यानें भरलेला-
नभसागर, विशाल पसरलेला;
रंग याचा निळा निळा !
यात मनसोक्त पोहू ईच्छिणारा
बुडणारा नाही कधीच
पोहता येत नसलं तरी ।

घेतलं नजरेत सामावून
तर मन येईल आनंदानं उचंबळून
ऐकलं एकाग्रतेनं भावोत्कटतेनं

तर अनुभूति येईल खोल मनात
भरभरुन भारुन टाकणाऱ्या
निरंतर शांततेच्या गोड गाण्याची ॥

डोकं जेव्हा झालेलं असत जड
ताणल्या गेल्या असतात शीरा सज्जड
उद्विग्न झालेलं असत मन,
घेतला अशावेळी प्रवेश
रात्रीच्या काळोखात
बघत वर आकाशात
तर दिसेल विस्मित करणारं दृश्य !
दिसतील लक्षावधी काजवे
चांदण्यांच्या रुपातले,
दिव्य आनंदाच्या शोधात
भिरभिरत झगमगणारे !
दृष्टीपथात येतील अगणित रत्ने
अंतरीक्षरुपी द्विव्यभूमीवर
इंद्रधनुष्याच्या रंगात चकाकणारी
चहूंकडे विखुरलेली !

एक अभूतपूर्व दृश्य !
हृदयाला भिडणारे !
आत्म्याला तृप्त करणारे !!

❑ ❑

## ४. "आकाश बालमनातलं"

रंग आकाशाचा निळा निळा
त्याला क्षितिजावर भिडणारा

सागरही तसाच निळा,
जणूं आकाश नि सागरात
आवळ्या जावळ्याची कळा !

उंचच उंच आकाश
तितकीच उत्तुंग ही डोंगरांची रास,
आकाश नि डोंगर परस्परांचे मित्रच खास !

खोलच खोल हे आकाश,
तोडीस तोड खोल ही दरी,
आकाश नि दरीत
जणूं गाढ स्नेहाचा पाश !

अफाट हे आकाश
विस्तीर्ण ही वसुंधरा;
जणूं दोघात वाहतोय
दिव्य प्रतीचा झरा !

असंख्य तारे नभात लखलखणारे,
हृद्य प्रसंग जीवनात फुलणारे
कसं करावं वर्णन यांचं
आनंदाचा वर्षाव करणाऱ्यांच ?

ढग नभातले-निळ्या निळ्या
वृक्षलतावरील फुले नि कळ्या
झुलतात, डोलतात, मनमोकळ्या !

रविराज विहरतो गगनी
शशीकिरणानी उजळते रजनी;
जणू करतात ते वसती
आपापल्या आवडत्या सदनी !

झुळझुळणारे पावसाळी वारे
हंसरं मन, खिदळणारे, बागडणारे;

जणूं गोड गोड गाण्यांची गुण गुण
उल्हसित मनाला नाचवते टुण टुण !

"माझ्या मनांत भरलेल्या आभाळा,
मधुर नाद करीत सर सर ये खाली;
ये घेऊन माझ्यासाठी,
भरभरुन ताऱ्यांचे प्याले !
मोबदल्यात देईन मी तुला,
गोड, रसाळ पिकली फळे !

नाचू लागेन मी
आनंदानं बेहोष होऊन
कर माझी ही ईच्छा पूरी
चटकन् सुखद आगमन करुन !

 

## ८. "तुझी माझी भेट स्वप्नातच फक्त"

एकदा एका माणसाला
लागली निकड बाह्याकाशाची
निघाला त्याच्या शोधात,
घेऊन दुर्बीण हातात;
नि जाळे ठेऊन मस्तकावर
भटकत राहिला खूप लांबवर,
हजारो कोसभर !

बगलेत एक करंडी
कमरेला गुंडाळून दोरखंड
घुमत राहिला तो
ऊत्तरकडे बराच काळ!
क्षितिज दिसत होतं जशाचं तसं,
अंतराळ पसरलेलं पुढं नि मागं;
कुठंतरी केव्हा तरी लागेल त्यांचा किनारा
ही अमर आशा मनांत बाळगत
पुढं पुढं जातच राहिला बिचारा!
"पण कितपत राहणार चालू असंच
अंतराळाचं व्यापून राहणं ?
पर्वतराज हिमालयाच्या पलीकडेही
आहे कि काय याचं ठाणं ?"
मनात वाहत या शंकेचा भार
तो पोचला हिमालयाच्या माथ्यावर;
फिरविली दृष्टी मोठ्या आशेनं सभोवार
पण हाय!
पाहतो तो काय ?
अंतराळ अजुनी पसरलेलं क्षितिजापलीकडं!
हसत होतं ते गालातल्या गालात
मिष्किल पणे पहात त्याच्याकडं!

आता मात्र तो थकला-भागला,
चक्क झोपी गेला;
स्वप्न पडलं त्याला;
पुनश्च दिसलं त्या "स्वप्नात"
उत्तरावकाशातून साकारलेलं,
खोल अंतराळ, निळं निळं.
पाहू लागला तो

स्तिमित नि उल्हसित होऊन;
नि शब्द पडले त्याच्या कानी,
त्या निळ्या पोकळीतून;

''माझ्या प्रिय मित्रा,
कशाला करतोस हा आटापिटा ?
तुझी माझी भेट फक्त स्वप्नातच;
जोवर असशील स्वप्नात तू,
तोवर पाहू शकशील मला
तुझ्या सन्निध असलेला !
नि पडशील शोधायच्या फंदात जागेपणी
तर होईन दूर, तुझ्या पासून !!

तुझी ही दुर्बीण नि दोरखंड
हे जाळे नि करंडी-रिकामी,
आहेत सारे कूच कामी !
कशाला वाहिलास हा निरर्थक भार ?
मला ठेवायला बंधनात -
नाही लावू शकणार ते हातभार !

ठेवतील ते बंधात तुलाच;
दे त्याना भिरकावून,
पहा तुझ्या डोळ्यातच डोकावून;
दिसेन बसलेला मी ठाण मांडून,
टाक एक कटाक्ष तुझ्या हातावर,
मी दिसेन उभा ठाकलेला त्याच्यावर;
काढ झटकून सारे विचार मनातून,
मला पाहण्याकरिता बाहेरुन-आतून.

इतक्यात जो जागा झाला
स्वप्नातून बाहेर आला;

पाहतो तो त्याच्या अवती भवती
अंतरीक्ष खाली वरती !
क्षणभर झाला भास त्याला,
स्वत: अंतरीक्षाच्या पोकळीत
तरंगणारा, इवलासा मासा !!
हलला तो थोडासा
पोकळीच अस्तित्व जाणवलं त्याला !
त्याच्या बाजूला पडलेली करंडी
गेली होती भरुन पोकळीनं
अडकवून ठेवली होती पोकळीला
त्याच्या त्या जाळ्यानं !
टिपलं होत पोकळीला, त्याच्या दुर्बीणीनं !
झेलून ठेवलं होतं पोकळीला
खोल खाली दरीनं !
अंतराळाचं स्वप्न मनांत रंगवत
परतून आला तो खाली
नि त्याच्या शोधाची समाप्ती झाली !
अंतराळानं बाजी मारली !!
अंतराळानं व्यापून राहिला होता
चहूंकडचा परिसर !

या साऱ्या अनुभूतीच्या आनंदाचा आस्वाद घेत
आतापर्यंत त्यानं चालविला होता जो शोध,
त्यातून त्याला झाला होता जो बोध,
त्याच्या आठवणी प्रीत्यर्थ
आराधना करण्याकरिता
त्यानं उद्दीपित केला एक नंदादीप !!

# ६. ''किमया किरणांची''

प्रकाश किरण म्हणजे
असावे काही बाही;
नक्की जाणू ह्मणावे तर
किरण आशेचा एकही नाही !

जाणतो आपण सारेच
प्रकाश असतो कसा;
पण सांगू शकेल का कुणी
कि किरण दिसतो कसा ?

न्हाऊन निघतील डोळे पुरते
किरणांच्या सागरात;
पण नाही दिसणार त्यांना
त्यांच खरं रुप प्रत्यक्षात.

सप्तरंगी किरण इंद्रधनुष्याचे
स्वार होताच फिरत्या चक्रावर
दिसतो रंग पाढंरा शुभ्र.
पण हे पांढुरकं म्हणजे
किरण नव्हेतच काही.

झाडे फुलं नि आकाश
यावर रंगांची उधळण करतो प्रकाश;
मोहक खजीना निसर्गाचा
निर्माण करुन देतो प्रकाश !

शुभ्र शानदार संगमरवर
नि जलबिंदुची मोतीरुपी काया
गुलाबी गाल, लोभस ओठ
साऱ्यांच असं आकर्षक रूप,
ही किरणांची तर किमया !

किरणामुळंच भरते डोळ्यात
उत्तुंगता डोंगर पर्वतांची,
कळून येते खोली, दऱ्या खोऱ्यांची ;

किरणच जर कायमचे जातील निघून
तर डोंगर-पर्वत दऱ्या खोऱ्या
कुठून दिसतील उठून ?
स्वर्गनरकासकट
सारेच जातील सरमिसळून !

किरणांची काय वर्णावी किमया ?
पसरता हळूवार
लखख ऊजळून निघते
अखखी दुनिया !

 

## ७. "झेप घेत, विलीन होतो मी तुझ्यात"

घनदाट जंगलातून
तासन् तास नागमोडी वळणे घेत
आला एक ओढा,
एका उभ्या चढणीच्या कड्यावर
खोलदरी समोरील पाहून
उद्गारला तिला उद्देशून,
"हे प्राण प्रिये,
अनेक योजने खडकांवरुन सरपटत
त्यानां पार करीत मोठ्या कष्टानं

हा बघ मी पोचलोय येऊन तुझ्या जवळ;
मन भरलंय काठोकाठ समाधानानं.

कोण भागवतोय तहान माझ्यानं
कोण काय पिकवतोय माझ्या वाटेत
घडलेल्या जमीनीच्या ओलाव्यात,
लक्ष न देता तिकडे पळभरही,
एक सारखा होतो वाहत वाहत
गुंगलेला तुझ्याच विचारात
तुझ्या मीलनाची स्वप्ने रंगवत
चारी दिशात तुझा शोध घेत
कुठं भेटतेस का याचा वेध घेत !!
सखे जीवलगे
कां ग बसलीस दडून
या खोल दरीत

हिरव्यागार हिरवळीचा हार
गळ्यात तुझ्या झळकतोय;
किरीट शोभिवंत कडयांचा
मस्तकी तुझ्या शोभतोय !
हे काय ? हसतेस होय माझ्या अवस्थेला ?
तुझ्या शोधाच्या नादात मला मिळालाय
मधुर मोदाचा मोबदला ।
आनंद मावत नाहीये गगनात
आता भरलीयस तू माझ्या मनात !

तुझ्या मधुर मीलनासाठी आतुर मी
हा पहा आलोच तुझ्याकडे !"
असे म्हणत ओढ्यानं
धारण केलं रुप धबधब्याचं;
नि दिलं खाली झोकून स्वत:ला
स्वर्ग प्रीतीचा गाठायला !

मीलनाच्या रूपात
आनंदसागराला आली भरती !
नाचू लागला निसर्ग
धुंद ऊल्हासाच्या तालावरती !!

❑ ❑

## ८. "स्वर्गातून अवतरणाऱ्या जलधारा"

स्वर्गमुखातून झेपावतं पाणी
भरधाव, डोंगर माथ्यावर;
वेगानं वाहत झटके देत,
लोटांगण घेत, खळखळत, घरंगळत,
येतं खाली घाई घाईनं
जसं एखादं शाळकरी पोर
घरी परतणारं लगबगीनं !
भोवळ आणणाऱ्या ऊंचीवरुन
खाली वाहणाऱ्या पाण्याला
वाहतं कसं म्हणावं ?
साक्षात् उडी घेत असतं खाली !
सौंदर्य सागरच निर्मून देतो हा प्रपात
आपल्या अवती भवती, भोवताली !
घुमणाऱ्या गगनभेदी आवाजाचा दणदणाट
हादरवून टाकतो काळजाला
त्याचा थरकाप करीत !
विचारांची मरगळ नि दुःखांची झळ

गळून पडते सुकल्या पानाप्रमाणं
त्याच्या प्रचंड खळबळाटानं !
त्याच्या तालबद्ध प्रतिध्वनीच्या नादावर
फेर धरीत नाचूं लागते मन,
बेभान बनून !
व्यापून टाकतात दरी खोरी
ऊंच मोहक जल तुषार.
लोभस इंद्रधनुष्याच्या रूपानं
साकारतो वासरमणीचा विचार !

विविध वर्णरुपी इवलेसे देवदूत
वावरु लागतात सफाईनं धीटाईनं;
भारुन टाकतात अख्खा आसमंत,
भरल्या आनंदानं उत्फुल्ल उल्हासानं !!

❑ ❑

## ९. "सूर्यास्त"

सूर्यास्तकाली पश्चिमेला
किरमिंजी रंगाचा थाट
तरंगतात दोण ढगांचे
भरलेले सुवर्ण कणानी काठोकाठ
रंगलेल्या आकाशात
प्रकाश नि ऊब
धारण केलेली वसुंधरेची काया
जणु चैतन्य नि स्नेहाची शीतल छाया,
बुडत चाललीय काळोखाच्या कुशीत.

नवग्रहांचा स्वामी,
दिव्य कुशल रंगकर्मी,
साकारतोय किरणांच्या कुंचल्यातून
शोभिवंत चकाकणारी
गिरिशिखरे नि निसर्ग

पण हाय !
ह्या तेजःपुंजाच्या ही प्रारब्धात
ठरलेलाय त्याचा अस्त !
जस जसा येतो तो वर तळपत,
खुलू लागतात सौंदर्याचे पट
पाण्याचं होतं बाष्प;
जातं वर, बनतात त्याचे ढग
मग सर्वत्र पर्जन्यवृष्टी
बनते हिरवीगार सृष्टी
हर्षोल्हासाला येतं उधाण

पण हाय !
दैवलिखित तर घडणारच;
त्याचा अस्त होणारच !
आगमन-निर्गमन
हा तर सृष्टीचा क्रम
जसं दिवस नि रात्र
जीवन नि मृत्यु
पाहिलंत तिकडं ?
तो निघाला सूर्य, चालला-गेला
झाला दृष्टी आड !!

□ □

# १०. “अभीष्ट चिंतन, एका बालकाचे”

देवा रे देवा
हा कसला चमत्कारिक ठेवा ?
हा सुर्य दिसतोय किती लालबुंद बुवा !
अग आजी, सांग ना मला-
असा कसा ग हा लाल रंगानं माखला ?
तेजानं तळपत होता तो अख्खा दिवस;
असं काय घडलं
कि तो किरमिंजी रंगात बदलला ?
बरं का ग आजी !
पाहिलंस ना त्याच्या चेहऱ्याकडं ?
ओघळतय रक्त लाल चुटुक
करीत त्याचा प्रकाश अंधुक”

“ऐक बाबा ऐक।”
बोलला त्याचा भाऊ;
“दुष्ट असतात दयारहित.
दुखवतील ते तुझ्या मनाला
नेहमी लागले असतात या कामाला.
थुंक त्यांच्या तोंडावर
त्यांचे काळे तोंड पाहू नकोस;
गेले ते नरकात तरी
तमा त्याची बाळगू नकोस !
ऐक तू माझं; जा आता घरी,
अखेर मातेची ममता हीच खरी !
देईल ती तुला आनंद
होईल मन तृप्त स्वच्छंद.
जा धाकल्या जा !
माझ्या शुभेच्छा घेऊन जा,
आईच्या कुशीत विसावून जा,

गोड स्वप्नात रंगून जा !
माझ्या छकुल्या,
भेटू या आपण उद्या पुनः,
हृद्य भेटीचा आनंद लुटू या पुनः,
आख्खा दिवस खेळू या पुनः.

 

## ११. "रणरणता वासरमणी"

एखादा निखळलेला खडक
जातो जसा निसटून तडक,
टेकाडाच्या उतारावरुन
येतो थेट खाली थडक
तसा हा दिवस !
मध्यान्हीच्या शिखरावरून
जातो निसटून घरंगळत
दिवे लागणीला होतो अस्तंगत !
दुपारचा वेळ थोडं कमावण्याचा;
पण असतो तो डाव परत गमावण्याचा !!

थकला भागला मरगळलेला
सुरकतलेला विकलांग झालेला
दिवसरुपी म्हातारा
आली असते अंतिम घटका
काळवंडणाऱ्या त्याच्या काळाची
उरणार नसते निशाणी
धगधगत्या प्रकाशाची

अरे प्रभाकरा
तुझ्या उज्वल कालाचं
माजलं होत स्तोम !
पण पश्चिमेच्या तळाशी
संपतोय तुझा जोम !!
दुपार झालीय
भुतकाळात जमा !

आग किती पारवडलीस तूं ?
आम्ही मात्र बचावलो त्यातून सही सलामत !
तुझा कर्दनकाळ असलेल्या कातरवेळेचं
स्वागत करायला नि उत्सव साजरा करायला !!

❑ ❑

## १२. "सूर्यास्तकाळी समुद्रकाठी एक लहान मूल !"

एक लहानगं मूल
जणूं उमलतं फूल,
निष्पाप नि निरागस
बघण्यात होतं मश्गुल,
वाळूची चटई पसरुन
समुद्रकिनारी बसून !

पाण्यानं भिडलेल्या क्षितीजावर
अलगद सरकत होता सूर्य
लाटा डुलत होत्या
हेलकावे देत सूर्यबिंबाला;

गुलाबी स्वप्नांना, पसरायला दर्यावर
दिली करुन मोकळी वाट रविराजानं.
अपूर्व दृश्य !
देहभान हरपलं मुलाचं,
जणू देहाचे बनले फक्त दोन डोळे !
डोळे भरले काठोकाठ त्या स्वर्गीय दृश्यानं
उत्स्फूर्त उद्गारला तो, नव्हे ओरडलाच
"चेंडू रे चेंडू" उल्हास भरणारा चेंडू !"

बघता बघता तो पांढुरका गोळा
हळुवार घरंगळला लाटावर
रुपेरी प्रकाशानं धारण केला
लखलखीत तांबूस रंग.
आकाशाच्या भालावरचा
भला मोठा लाल टिळा
पुसट होत बुडत पुरता बुडाला;
कुठंय आकाश नि कुठंय पाणी ?
विश्रामधामाला गेला वासरमणी !
राहिलं मागं सर्वत्र शून्य !
रंगात रंगला आसमंत.
निसर्गपित्याचा जीव त्याच्या बाळावर
नि बाळाचा जीव गुंतलेला दिव्य दृश्यात !
निरागस बाळाची वेधक करामत
मोठ्यानाही नाही साधत सहजासहजी !!

तिथं मूल होतच कुठं मुळात ?
होता निसर्ग, हसरा दिलखुलास
सर्वत्र सुखद रंगविलास !
रंग, रंग, रंगच रंग
दिव्य निसर्गाचा डौलदार ढंग !!

# १३. ''अपरान्ह''

दिवसाप्रमाणं ठरलेलय आयुष्याचंही चक्र;
पूर्वान्ह, मध्यान्ह नि अपरान्ह !
जीवनाच्या नव्हाळीत माणसं रमतात,
सुखावतात परमोच्च गाठण्याच्या ध्यासात !
दुपार सरते नि होते सुरवात,
चिंतेनं त्रस्त जीवन संध्येची;
चुकचुकते पाल अंतिम काळाची.

हास्यापासून आसवापर्यंत
एक प्रदीर्घ प्रवास खडतर सुखहीन.
दीन, दुबळी दिशाहीन
अशी गत जगाची नि जीवनाची,
तेज:पुंज प्रकाशाचा धनी,
तो पहा चाललाय अस्तंगताला;
कोणी थांबवू शकेल त्याला
रोखून काळाला ?

दिवाकरा !
न्हाऊन काढ आम्हाला सौंदर्य किरणानी
रात्रीच्या विळख्यात अडकण्यापूर्वी.
अनंत आकाशातल्या प्रदीर्घ प्रवासांत
जे पाहिलंस नि अनुभवलंस,
त्याच्या सुरस नि सरस कथा
सांग तुझ्या ओजस्वी शब्दांत
तुझ्या मनस्वी कथनानं
तू होशील उत्साहित प्रसन्नचित्त;
आम्हासही येईल अत्यानंदाचा प्रत्यय !

नंतर आहेच वाढून ठेवलेलं पुढं
आपल्या दोघांच्याही नशीबी
प्रकाशाला झाकोळून टाकणारं
काळरात्रीचं भयाण भेसूर हास्य !

 

## १४. "हास्य बदलतं आसवात !"

मध्यान्ह झालेली भूतकाळाच्या पडद्याआड
उशीर असतो थोडा, सुर्यास्ताला
सवड मिळते वामकुक्षीला !
धगधगतं ऊन
पोटाची खळगी भरलेली
पापण्यावर झापड आलेली
दिवास्वप्ने पहात मनोदेवता रमलेली !
अंडी उबवत श्रांत पहुडलेले पक्षी,
त्याना पाल्या पाचोळ्याचा थारा;
जरा कुठं नावाला
हजेरी लावणारा वारा !
लागता डुलकी, मिळतो आराम
दरम्यान ऊन पावतं पूर्णविराम !
डोकावू लागता सायंकाळ
विराम पावते झोपेची मरगळ
तरतरीचे होते परतून आगमन
जीवन होते पुनश्च गतिमान !

धुंद वातावरणात
बागडू लागतात बालिका;
टुणटुणु लागतात पाखरं
खेळात रंगतात पोरं
आनंदाचं साम्राज्यच खरं !

मात्र अनुभवूं शकत नाहीत
मध्यान्हानंतर हा आनंद
भोगात रोगात जखडलेले
आंबलेले, चिंबलेले, म्हातारे कोतारे !
काय वर्णावी मध्यान्हीची अद्भुतरम्यता !
गजबजलेल्या क्षणातला
अवकाश रिता, विश्रामाकरिता !!

 

## १८. "अजब घडण मानवाची"

माणूस, फुलाच्या गुणारुपाचा;
अवयवाच्या पाकळ्या
भावनांचा सुगंध
मातीतून फळणारा
मातीतून फुलणारा
सुर्यासह खुलणारा
चंद्रासह डुलणारा.
सूक्ष्म प्रकृती
हाच मूळ पुरुष अर्थात, मूळ बीज;

त्याचं भावी जीवन
ऋषी मुनींच्या रुपात तरी
बहरुन येईल एक;
किंवा, अत्यंत रक्तपिपासु
अथवा कमालीचा दयावंतही
बनला जाईल तो!
तो जीवन नि मरणाचं
भल्या नि बुऱ्याचं
अशा परस्पर विरुद्ध प्रवृत्तींचं
स्वत:ला बनवून ठेवतो
एक अजब मिश्रण !!

त्याचं मस्तक झेपावून पोचतं स्वर्गात
तर पाय अडकतात खोल घोर नरकात
नि जीभ असते वळवळत त्याच्या ह्या राहत्या जगात !
तो शब्दांनी बांधतो घरटं
भुरळ पाडायला अशक्य वाटणारं !
पण गंमत वाटते ती ही की
भिजलेला असतो तो आकंठ प्रत्यक्षात
कामक्रोधाच्या विकारसागरात !
त्याच्या हृदयातून टपकतात भाव
एकामागून एक, लालसेचे नि द्वेषाचे !
असं हे माणसाचं विक्षिप्त रूप,
माणसालाच कोड्यात टाकणारं !!

त्याच्या शब्दाचं घरटं मूळातच कोरडं
बरसणारं हृदय असं चिंबलेलं !
जेणेकरुन...
वरपांगी तो दिसत असला हसत
तरी असतो आतल्या आत रडत !!

❑ ❑

## १६. “बलदंड हा माणूस !”

माणूस एक नदी,
सुप्तशक्तीनं ओथंबलेली,
जबरदस्त निर्मितीक्षमतेनं
सतत प्रवाहित असणारी !

मानवसरितेचा पृष्ठभाग हाडा-मांसाचा,
खोल आतवर सर्वत्र
भडकत्या ज्वालेतल्यासारखी धगधग !

त्याची शक्ती आहे त्याच्या ज्ञानात
त्याचं बळ मोह मत्सराच्या रुपात
जीवनसृष्टीतला अत्यंत साहसी प्राणी
लावारसाच्या रूपात
द्रवीभूत खडकचे खडक
ओकणाऱ्या ज्वालामुखीत
डोकावण्यास धजावणारा;
जिथं बर्फाचीच शय्या,
खाद्यान्नही बर्फाचंच,
त्या दक्षिण ध्रुवात
वस्ती वसविणारा;
कराळकाळ दिसत असला
ठाकलेला समोर तरी,
बर्फाच्छादित दऱ्याखोऱ्यात
तळ गाठायला खोल उतरणीवरुन
घसरत जाणारा !
शार्क माशांच्या थव्यात
पोहण्याचं धारिष्ट्य करणारा,
देवमाशाच्या पाठीवर स्वार होणारा;

वादळ नि वावटळींनी
महासागरही जातात हादरुन;
पण बलदंड हा माणूस
कोडगा हसत, उरतो त्यानाही पुरुन !

निसर्गाचं लाडकं पोर !
निसर्गाची ह्याच्यावर अमाप प्रीती :
नाही याला कशाची भीती !
रासायनिक स्फोटकाशी खेळ मांडणारा,
सक्षम अणूंना, अवजड घटकांना
आडदांडपण पिळवटून काढून
उर्जाशक्तीचा जबरदस्त उद्रेक घडविणारा !
जणू साक्षात मृत्यूचा नंगानाच !!
सबंध जग होरपळून निघत असता
निवांत बघत, आसुरी आनंद घेणारा,
कोडगा बलदंड हा माणूस !

थेट चंद्रावर झेपावून
तिथल्या धुळीत पाय रोवून
हर्षानंदानं उभा ठाकणारा !
नाही तिथं पाणी, नाही हवा;
हे माहित आहे त्याला
तरी तो चुकत नाही
साहसानंदाने भरलेल्या ताटावर
सडकून ताव मारायला !
पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाला
लाथाडून मागे सारणारा;
अवकाशाच्या अनंत पोकळीत
जोमानं मनसोक्त झोके घेणारा,
साहसी प्रवृत्तीवर शिक्कामोर्तब करणारा !

हा माणूस !
    जीवोत्क्रांती तत्वाचा एक ठोस दाखलाच !

एवढ्यानंही अतृप्त हा माणूस,
    रंगवतो स्वप्न पोचण्याची
    खाली पाताळात नि वर आकाशगंगेत !

कदाचित घ्यावे लागतील
    कोट्यवधी जन्म त्याला
    तिथंपर्यंत पोचायला !

तरी आखतो तो योजना
नि घेतो झेप एका भल्यापहाटे
नि परिणामी होतो शून्यात विलीन !!

धन्य आहे या साहसी प्राण्याची
    करावी तितकी थोडीच
    प्रशंसा त्याच्या साहसाची !!

□ □

## १७. "अजब हा माणूस"

माणूस,
एक अजब प्राणी
दोन पायानी चालणारा
    मात्र उंच आकाशात चालून जाण्याच्या
    फंदात न पडणारा
    आपल्या इंद्रियांचा दास
    त्यातल्या त्यात घ्राणेंद्रियाचा खास !

म्हणवतो शाकाहारी
रक्ताची तर चट भारी !
शहाण्यातला शहाणा समजून बसणारा,
(उंटावरचा हा शहाणा)
चर्मवस्त्र धारण करणारा
जटाधारी बनणारा,
दयाळू आत्मा समजणारा स्वत:ला !

घराभोवताली बागबगीचे फुलवण्याची
गोड स्वप्न बाळगणारा;
नि करुन भारी जंगल तोड,
आपलं नशीब उजळण्याचे बेत आखणाराही !
पाळीव प्राण्यांची संग्रहालयं थाटणारा
नि त्यांच्या लगतच कत्तलखाने चालविणारा !
अजब प्राणी हा मानव.

निसर्गाची लेकरे
मानल्या जाणाऱ्या प्राण्यावरुन,
जीवन ओवाळून टाकणारा
नि लालचावलेल्या जीभेनं
मांसाहार चविष्टपणं चघळणारा !
त्याची शहाणी (!) बुद्धी म्हणते
"प्राणीमात्रावर प्रेम कर".
त्याचं अंतर्मन खणखणतं
"हवहवसं वाटणारं
पदरी पाडून घेण्यासाठी
प्रसंगी खूनही कर !"
स्वर्गात बसल्या बसल्या
बुचकळ्यात पडलाय
तिन्ही जगाचा स्वामी
"काय अजब ही
माणूस नांवाची असामी" !

□ □

# १८. "तीक्ष्ण बुध्दीमत्तेचा सुक्ष्म प्राणी"

प्राणीमात्रात ज्येष्ठ नि श्रेष्ठ-मानव !
प्रकर्षानं तळपते त्याच्या हाती
बुद्धीमत्तेची तेजस्वी मशाल.
त्याच्या भावना वाटतात
मृदु नि विशाल !
सूक्ष्म विचारधारा करतात कमाल !

प्राणी मात्रातले त्याचे जातभाई
उडतात, पळतात, पोहतात आरामात,
याचं मात्र चालू असत शून्याभोवती गरगरणं
सणसणाऱ्या काळाच्या तालावर !

इवलासा जीव भारी चमत्कारिक
सत्ता चालवतो जीव सृष्टीवर !

शक्तीमान हत्तीना जुंपणारा
महाकाय देवमाशांना वेसण घालणारा
नि ईप्सित साध्यासाठी
त्याना वेठीला धरणारा !

स्वत:ला जगत्‌त्राता समजणारा
स्वर्गसुखाच्या जगात बेदरकार वावरणारा;
विस्तारलेले त्याचे हात
जगाच्या माथ्यावर थेट पोचलेले !

सुक्ष्माणुंच्या गाभ्याचा
उघड्या डोळ्यानी अचूक वेध घेणारा,
खगोलातील ताऱ्यांची गणती करणारा
गहजबचा हा जादूगार !
काळालाही सारत मागं पुढं
त्याच्या पोटात दडलेलं हेरुन काढतो नेमकं !

याच्या जादुच्या कांडीनं
एखाद्या दगडाला, झाडाला किंवा ताऱ्यालाही
केला रे केला स्पर्श
कि उलगडून जाईल
त्यांच सारं जीवन रहस्य

असा हा माणूस !
एक अद्‌भूत सिद्ध पुरुष,
दिव्य शक्ति प्राप्त झालेला
निसर्गाचा सार्वभौम राजाच !!

 

## १९. ''मन करते माणसाची फसगत''

कृतकृत्य झालाय माणुस;
त्याला लाभलंय मन-
संवेदनशील, चिंतनशील.

वगळलं मनाला कि
जाणवत नाही माणसाचं अस्तित्वच !
मनात वसणारा माणूस
नि माणसात वसणारं मन-
यानं सुखद बनत जीवन !

मन कोरतं मनात-
प्रतिमा महामानवाची;
नि माणसाची होते प्रबळ ईच्छा,
तसाच एक बनण्याची!

मनाची भरारी कल्पनातीत;
बनवते कल्पनेचा स्वर्ग
नि कल्पनेचाच नरक!

माणूस घेतो जीवापाड मेहनत, स्वर्गप्राप्तीसाठी
नि करतो संघर्ष नरकवास टाळण्यासाठी !
मन रंगवत कपोलकल्पित कथा
महात्म्यांच्या नि दुरात्म्यांच्या;
महात्मे रमरमाण देवदूतात
नि दुरात्म्यांची परवड घोर नरकात !

विसर पडतो माणसाला
स्वत:च्याच मनाच्या डावाचा;
केवळ मनरंजनाकरिता असतात-
ऐकायच्या या कथा;
पण तो मानतो त्यानाच प्रमाण ।
साध्य उद्दीष्टांच
किंवा वर्ज्य गोष्टींच !!

माणसाचं मनच त्याला बनवितं मूर्ख
नि माणूस करत असतो मनापासून
मनाची सेवा!

 

## २०. ''हे विश्व आहे माझ्याचसाठी''

" हा सुर्य तळपतो माझ्यासाठी,
दिन-रातीच्या क्रम, मेघांचा अभिषेक
वृक्षांची फलधारणा आदी कृत्यं अनेक

घडतायत केवळ माझ्यासाठी''
अशी ही दर्पोक्ती
या विचारवंत (?) वानराची !

''सृष्टी निर्मात्यांच असलं पाहिजे
माझ्या सारखंच रूप !
कारण हे रूपच तर आहे
एकमेव पूर्णस्वरूप !!''-
मोठया दिमाखानं ऐकवतो तो स्वत:लाच !

विखुरलेल्या अगणित ताऱ्यानी
व्यापलेला अनंत अंतराळ,
जिथ आहे अखंड गतीमान काळ-
हे निर्मिलं आहे ज्या सृष्टीकर्त्यानं,
त्याच्याकरता बांधतो हा माणूस,
''मंदिर'' नावाची दगडी कोठडी !
बसवतो त्याला आत मध्यात,
चढवतो त्याच्यावर कापडाची चिंधी,
मढवतो सोन्याच्या आभरणानी;
बंद करतो दरवाजा
नि पिटीत डांगोरा
सांगत सुटतो जगाला.

''लोकहो तो पहा महान सृष्टीकर्ता
उभा ठाकलाय तिथं आंत, मंदिरात,
गौड नैवेद्य अर्पण करणाऱ्या
आपल्या भक्तांची वाट पहात !''
हूं! जणूं ब्रह्मांडनायक भुकेला आहे ।
माणसानं त्याला भरवायचं आहे !!?

भुकेनं व्याकुळ वाघ
माणसाला बनवितो लक्ष्य
आपलं भक्ष्य म्हणून,
नि ओढवून घेतो स्वत:वर
निर्वंश होण्याचे संकट !
जर का केली मानवानं
केवळ हौसेखातर वाघाची शिकार,
दस दिशात होतो त्याचा
कौतुकानं जयजयकार !!
वा:! किती न्यायप्रिय धर्मात्मा हा!

त्याच्या स्तुतीपर गायिली जातात कवनं
धर्ममार्तंड सांगतात ठासून-
" हे मानवी कृत्य धर्मानुरूपच!"
पवित्र नीती धर्माची
अशी ही क्रूर थट्टा !
"गुलामगिरीच्या विरोधात आहोत आम्ही;
सारा पुरूषवर्ग स्वतंत्र
सारी स्त्रीजात गुलामीतून मुक्त !
समानतेच्या आधारित जीवनाचा
मनापासून पुरस्कार करतो आम्ही!!"
साधुत्वाची अशी भाषा करणारा
मानवी सैतान हा-
ठोसे मारून डुक्कर मारतो
बेडकांचे पाय कापून काढतो
लचके तोडतो जीवंत पक्ष्यांचे
प्राण्यांची निर्दय कत्तल करतो.

वाहत असतात रक्ताचे पाट;
नि चालू असतात याचे वेदशास्त्राचे पाठ !!
उंट,गाई,बैल बछडयांना
याक, हत्ती, गाढव,घोडयांना

राब राब राबवतो माणूस.
स्वार्थपूर्तीसाठी, उदरंभरणासाठी
माकडाना बांधून नाचवितो
पोपटाना पिंजऱ्यात बंदिस्त करतो;
तरी कोडगेपणाने मिरवितो
"मी जीवनावर प्रेम करतो!"

## २१ "अजब याचं व्यक्तिमत्व"

माणूस हा असा-
डोक्यात उजाळा दिवसाचा,
काळजात काळोख रात्रीचा;
देवत्वाचं सोंग पांघरलेला,
पृथ्वीवर बिनधोक वावरणारा,
शहाजोग जंगली पशू ।

त्याच्या डोळ्यातलं हंसरं फूल
प्रत्यक्षात असतं प्रतीक-
त्याच्या कुजक्या मनात
सडलेल्या कल्पनांच !
निर्मल नि प्रफुल्लित दिसणारा
त्याचा चेहरा मोहरा
आतून असतो काळाबेरा !

अध्यात्म विषयांत
पवित्र साधुत्वाचा आव
नि इंद्रियसुखोपभोगात
वानराच्या चपलाईनं धाव !

मूलत: कर्बावर आधारित,
नि प्राणवायुनं पुरतं भरलेलं
निसर्गानं विकसित केलेलं
एक अद्भुत मिश्र रसायन -
घन नि वायु अशा संयुक्त रूपातलं !

शरीराचा एक भाग जमीनीवर टेकलेला-
नि पार्थिव सुखात गुंतलेला;
एकभाग घेत झेप आकाशात-
गुंतलेला स्वर्गीय सुखोपभोगात !
"या अजब प्राण्याचं
करावं तरी काय ?"
या यक्ष प्रश्नानं
चिंतेत आहे चूर
भांबावलेला भरपूर
प्रत्यक्ष सृष्टीनिर्माता परमेश्वर !

"हा ईच्छितो तरी काय?
जीवन की मरण-
उत्कर्ष की पतन ?"
परमेश्वरालाही झालंय कळेनासं !!

 

## २२. "शोध नि बोध घेणारा माणूस"

ज्ञानामृताच्या करण्यापायी संचय
शिरून निसर्गाच्या पोटात,
सतत गुंतलेलाय माणूस शोध घेण्यात !

जशी एखादी मधमाशी-
रूंजण घालणारी गुणगुणत
फुलांच्या ताटव्याभोवती, मधुसंचयासाठी !

जिज्ञासेच्या अंकुशानं
भेदून कवच विश्वाच्या भट्टीचं-
रहस्य आंतलं जाणूं ईच्छिणारा,
सनातन वैश्विक सृष्टीपासून
आधुनिक जीव सृष्टी पावेतो, संचार करणारा,
आण्विक लहरींवर वर्चस्व गाजवून
त्यावर आरूढ होणारा -
अथांग पसरलेल्या अवकाशाच्या
एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत
मूळ वस्तुंच्या परिमाणाची मोजदाद करणारा.
तरत जीवाणूंच्या सागरात
स्पर्श जीवनाचा अनुभवणारा,
हा माणूस-
"अंतस्थात काय असावं दडलेलं ?
हे सारं कशानं असावं व्यापलेलं ?
उलगडण्याकरता हे कोडं
हृदयात शिरतो खोल;
नि त्याला होते अनुभूती
जीवाच्या स्पंदनाची
मानसिक संवेदनांची
वाहणाऱ्या विचारधारांची !
त्याना पार करतो,
जातो सामोरा अनंत शुन्याला.
नि हरवून बसतो स्वत:चे स्वत:लाच !
या हरवून घेण्याच्या कृतीत !!
त्याला गवसते स्वत:चे अस्तित्व !!

## २३. "माणूस-अमर आशेत जगणारा जीव"

प्रतिदिनी टपलेली असते रात्र,
करायला गिळंकृत सुर्याला
सुर्य मात्र रोज पुनः उगवतोच.
तसाच, माणूस नावाचा द्विपाद प्राणी;
ठेचा खातो वरचेवर
उभा ठाकतो उठून पुनः पुनः !
गगन चुंबी इमारती बांधतो माणूस.
वारा पाऊस भूकंप ऊन
कटच करतात जणूं एकत्र येऊन
उभ्या वास्तु धराशाही करण्याचा.
तरी होत नाही तो हताश कधी;
त्या ढिगाऱ्यांच्या छाताडावर
लीलया साकारतो,
पूर्वीपेक्षाही सरस नि भव्य प्रासाद !
कराल दुष्काळ, महापुराचे आघात,
आग ओकणारे उष्माघात
त्याच्या पांचवीला पूजलेले एकजात !
पण निधडया छातीचा - हा माणूस
वारंवार चाल करून येण्याऱ्या
मृत्युलाही पुरून उरतो !-
नि रसरशीत जीवन जोमानं जगतो !!
घाम गाळून-
त्यानं विकसित केलेली मानवी संस्कृती-
क्रूर नियती करते अशी नष्ट
की मागे रहात नाहीत स्मृतीचे अवशिष्ट !
तरीही - अविचलित हा माणूस

गुंतलेला असतो अव्याहत
पुनर्निर्माण करण्यात !
साक्षात यमराज ठाकलेला उभा दाराशी,
तशातही क्षणभराचे का होईना-
चेहऱ्यावर मंदहास्य खुलवितो-हा माणूस !
अमर आशा हेच त्याचं जीवन !!

 

## २४. "भीतीनं ग्रासलेला जीव"

घटकाभरानं कोमेजून जाणार असतं
गळून पडणार असतं...तरीहि
रोज सकाळी प्रसन्नतेनं
फूल उमलत असतं!

सूर्यानं टाकलं करपून
वाऱ्यानं काढलं झोडपून...तरी
नाजुक नजराणा हा निसर्गाचा
नाही करणार कुरबुर कधी.

सौंदर्य याचं डौलदार
साधुसंतानाही डोलविणारं !
कवीमनाला अनंत चैतन्याप्रत
खेंचून नेणारं !
पण कींव करावी माणसाची !
उज्वल चैतन्य लाभलेला-
पण ग्रासलेला काल्पनिक भीतीनं,
कण्हतो तिच्या ओझ्यानं !

याचं बुद्धी चातुर्य म्हणजे
अलादिनचा दिवा
मनांत आलेलं करून टाकणारा !

ठेवलं बटनावर बोट
कि झपकन पडतो प्रकाश,
शीतल बनते हवा,
झंकारतात तारा,
वेगानं वाहू लागतो वारा;
धावू लागतो, उडु लागतो
यंत्ररूपातला लोह !

जादुगार हा चमत्कार करणारा
मुलुखाची याची हुकूमत !
सागरी लाटाना जुंपवून
यंत्रांची चक्रे फिरविणारा
युरेनियमच्या शिलाकडून
घरांत इंधन पुरवून घेणारा.

किरणाच्या तरंगांकडून
संदेशवहन करवून घेणारा.
अद्‌भुत मुलुखाचा छोटा राजा हा !
डोंगर पर्वत उचलून ठेवणारा,
सागरचे सागर गोठवून देणारा,
नद्याच्या नद्या प्राशन करणारा
खनीजातलं तेल काढून
गतीवर स्वार होणारा !

चुकून जर का भेटला याला
परिजगतातला "ज्यो",
तर अचंब्यानं उद्गारेल तो
"हे 'मेरी जगत' कि 'फेरी जगत' ?"
विश्वासच ठेवायचा झाला

माझ्या डोळ्यावर
तर इथंच असला पाहिजे
स्वर्गांतला महास्वर्ग!''

हो ! पण.....
त्याच्या चेहऱ्यावर
नरकाची कशी काय छाया ?

खोल दडलंय मनात
त्याच्या दु:खाचं मूळ;
स्वनिर्मित भयगंडानं
त्याला लागलंय खूळ
त्याची यंत्रं-
नि शक्तिशाली अण्वस्त्रं,
त्याच्या मनाला करतात भीतीग्रस्त
खच्ची करतायत त्याचं मनोधैर्य !
मानसिक समाधान
पावलेलं अंतर्धान.

भयगडांचा धट्टाकट्टा समंध
थय थय नाचतो अंतर्मनात
मृत्यु ठोठावू लागतो जोरानं
त्याच्या स्वप्नसृष्टीची दारं !

 

## २५. ''सौंदर्यवेडा मानव''

सतत असतात गुंतलेली मानवेंद्रियं
सौंदर्य नि बहराच्या शोधात.
रमून जातो तो, मंत्रमुग्ध होऊन

टवटवीत हिरवळीच्या गालीच्यात !
भुरळ पाडतात त्याला
बहुविध रंगारूपाची
नाजुक मोहक फुलपाखरं.
नि मनात उठतात त्याच्या
हर्षोल्हासाच्या उसळत्या लहरी !
जरा कुठं पडली कानावर
गुण गुण, छन छन, रूण झुण-
हरपून भान त्याचं पूर्णपणं
सदासर्वकाळ करीत असतो
कामना सुखोपभोगाची;
प्रसंग असो कोणताही-कसाही!
जन्माचा वा मरणाचा
सुखाचा वा दुःखाचा !

अंगी बाणलेल्या या
अनन्य प्रवृत्तीच्या तेलानं
त्याचा जीवनदीप राहतो तेवता
थंडी वाऱ्यालाही न जुमानता !

चितारतो चित्रं रंगानी, रेघोटयानी
सौंदर्य त्यातून फुलतं, बहरतं;
कागदावर गिरवितो कलम,
नि शब्दातून बुद्धी चातुर्य ऊतु जातं!
रंगमंचावर नाचतो गातो
नजाकतेचं दर्शन घडवितो !

तो जीवन जगतो मुळी
सौंदर्याचेच स्वास घेत !

 

## २६. गाभ्यापासून वंचित मानव

चाचपडतो जीव अंधारात
डोळ्याना दिसतं अगदी अंधुक
कान ऐकतात फक्त कुण कुण,
फिरतो माणूस
पृष्ठभागाच्या अंवती भंवती,
मध्यबिन्दु नाही येत त्याच्या हाती.
झोक्याचा तोलही जातो
मध्यापासून दूर अति !

घोटाळतो लाटांच्या पृष्टभागावरच;
त्याला नाही माहीत
गाठावं कसं तळ ?
कसे लागणार हाती त्याला
तळात वसणारे सत्याचे मोती ?

गुंतलाय तो शतकानुशतके
अणुंच्या गहन खोलीचा
नि अनंत अवकाशाचा
मागोवा घेण्याच्या प्रयत्नात !
पण काय आलं त्याच्या हाती ?
डोंगर पोखरून फक्त उंदीर !!

जीवात्मा नि परमात्मा
विश्व नि काल
याचं निज स्वरूप काय?
यांचा परस्पर संबंध काय ?
चांगलं कोणतं नि योग्य काय ?

भाराभर प्रश्न करतो स्वत:ला,
उत्तरानी मात्र आज पावेतो
हुलकावणी दिलीय त्याला !

आपल्याला कशाचंच ज्ञान नाही
याची जाणीव होण्याइतपत मात्र
भरपूर ज्ञान आहे त्याला !!

 

## २७. "वारा"

पृथ्वीभोवती गरगरणारा
दऱ्याखोऱ्यातून भिरभिरणारा
डोंगर कड्यावरून ऊडणारा
जमीन सपाटीवरून सरपटणारा
अदृश्य वेगाचं जादुचं वारू...हा वारा!

सागर, त्याचं खेळाचं मैदान !
वाहता वाहता वाटेत-
गुणगुणतो, सूं सूं करतो, सणसणतो,
गर्जतो, थैमान घालतो, आकांड तांडव करतो,
जणू सदैव तत्पर असलेलं
धाडधाकट चंचल पोर !?

जणूं वेगात टपटपत जाणारा रबरी चेंडू,
जणूं सळसळणारा पारा !

वाहत आलाय आजपावेतो
नि वाहतच राहणार आहे यापुढेही तो-
-युगानु युगे, अखंड, अविश्रांत !
एक सारखी होत आली आहे
त्याची अज्ञातातून सुरवात,
कदापी होणार नाही-
त्याच्या शेवटाची सुरवात !
ग्रहगोलांच्या श्वसनात
ज्वालात, पंख्यात, प्राण्यात
चालू असतो अखिल चराचरात-
अखंड याचा बहाव
लक्ष्मण रेषाच नाही याच्या थांबण्याची !
प्रारब्धातच नाहीये विसावायचं !
सुक्ष्माति सुक्ष्म हा वारा-
आत्म्याचा संबंध
इहलोकाशी जोडणारा-
जर का थोडा बाजुला सरून,
राहिला थोडा वेळ,
वाहायचं थांबून,
तर ताटातूट ठरलेली
शरीर नि आत्म्याची;
ऱ्हास-सर्वनाश मृत्यु !

तेणेकरून सर्वार्थानं
"वारा हेच जीवन!"
"वारा हेच वैभव!"
"वारा एक वरदानच!"

□ □

## २८. "चिमण्याचं जोडपं-जणूं देवदूतांची जोडी"

गडद हिरव्या झाडीतून
पडलीत बाहेर, रात्रभर विसावून,
दोन चिमणी पाखरं,
एक चिमणा, एक चिमणी;
ती त्याची छाया, जिवलग प्रिया.
जणूं छोटे गोळे
मऊ मऊ मांसाचे ताजेतवाने,
पंखात जीव ओतून भरलेले !
कोवळे किरण बाल रवीचे
सोनेरी नि ऊबदार,
न्हाऊन निघत सकाळच्या भावणाऱ्या गारव्यात-
गोंजारतात हळुवार चिमण्या जोडीला !

चमकतात सोन्यासारखे;
असले जरी मूळात तपकीरी,
लखलखतात मखमली सारखी
त्या चिमण्यांची शरीरे !

चटकन बसतात, भुर्रकन उडतात,
दुडदुडतात, टुणटुण बागडतात.
जणूं तो एकटाच तिचं सारं जग
जणूं तीच एकटी त्याची सारी सृष्टी !

दुधासारखं मधासारखं
जीवन त्याना गोड, अजोड;
जशी तहानलेल्याला असते
पिण्याच्या पाण्याची ओढ !

जीव टाकतात ओवाळून एकमेकावर;
देवाचाही पडतो त्याना विसर,
स्वर्ग तर त्यांना
दोनच बोटे वर !

किलबिलत, गुणगुणत, खिदळत
भरते जीवनात गोडी !
ही देवदूतांची जोडी !!

 

## २९. घंटा

घंटा करते जग जाहीर
जीवाचं जगात झालेलं आगमन
नि घडलेलं त्याचं निर्गमन !
सुरु होताच घंटेचा नाद
ऐकू येतो अर्भकाच्या रडण्याचा सूर
नि आसमंतात येतो आनंदाला पूर !
घंटेचा एक घणाघात-
मेंदूवर होतो आघात;
जातो सोडून कायमचा एक
मागे रडतात अनेक !

बाळगून ईश्वरीकृपेची कामना-
देवळात ठाण मांडून बसलेल्यांना,

ठाम सूचित करते घंटा,
"जीवनाचा खणखणाट चालतो
केवळ कालाच्या तालावर !

कोण करतो हा खणखणाट ?
दिसत तर कुणीच नाही.
खणखणाट आहे, घंटाही नाही !!
एक अद्‍भूत रहस्य, आहे की नाही ?!

घंटा आहेत गळ्यात, मनगटात,
पायात, घरात, जीवनसृष्टीत, स्वर्गात !
करतात नाद एकसाथ अशा-
मानवी भावनांचा उद्रेक व्हावा तशा !

कुणकुण, रुणझुण, खणखण, ठणठण,
ही तर धातुच्या घंटेतून घुमणारी
मधुर नि भारदस्त गाणीच !

हे युग आहे घंटांचं !
जर का वाजायच्या थांबल्या,
तर ही दुकानं, ह्या गिरण्या,
ही देऊळं, ह्या शाळा
इत्यादींच्या बंद होतील हालचाली;
कष्टु लागतील रोगी;
विखरुन जातील विद्यार्थी;
उपाशी मरतील पुजारी;
जाईल रसातळाला, मानवी संस्कृती !

प्रत्येकाच्या मनगटात असते एक घंटा,
जीवन निभावून तारुन नेणारी !!

 

## ३०. ''मेघ''

डोंगर पर्वताच्या आकाराचा
जंगलांचा, जीवसृष्टीचा पोषणकर्ता,
नद्यानाल्यांचा, सरोवरांचा जनक,
जीव की प्राण - असा ढग,
जात असतो तरत आकाशात कोसन् कोस !

हलका फुलका वजनात प्रकाशासारखा
मऊ मऊ रेशमासारखा
दिसायला जरी राकट,
पण धुकंच धुकं सरसकट

या सृष्टीवर त्याची कृपादृष्टी;
धरतीवरील लाडक्या लेकरांसाठी
घेऊन येतो आपल्यासंगे
उल्हास नि उमेदीची शिदोरी.
त्याला चाहणाऱ्यावर करतो
तन्मयेतेने कृपावृष्टी.

महान कवी याच्यावर भाळतात
भाव विश्वात त्याच्यासह तरतात;
कल्पना विलासाची ऊंची गाठत खोलात जातात
अंतर्मनाच्या सागरात परमसुखात पोहतात.
थेट वर त्याना होते अनुभूती-
देवादिकांच्या सुखोपभोगाची-
अप्सरांची नि अमृताची-
वासस्थान असलेल्या साक्षात् स्वर्गाची !
ढग एखादाही आकाशात आला दिसून-
मानवी चेहरे जातात आनंदानं फुलून!

जर का यानं मारली
दीर्घकाळ दडी-
थरथरेल भीतीनं लोकांची काया
नि पडेल दुष्काळरूपी नरकाची छाया !
असा हा जीवात जीव आणणारा,
मातीत प्राण ओतणारा,
(प्राणप्रिय) राजाधिराज मेघराज !

□ □

## ३१. "निरागस"

एखादं कबुतर अथवा कोकरू
किती सालस, किती निरागस !
निर्मल, सरल हृदयी, निष्कलंक;
लहानग्या बाळाच्या रूपात वसतात
या जगन्नाथाच्या जगात !
लहानगं बाळ....म्हणजे
निरागसतेचा देवदूतच !
सत्य नि निर्हेत्तुक प्रेमाच्या
हिरवळीवर पटांगणात
आजन्म फवारणारा स्फूर्तीचा कारंजाच ।
असा हा देवदूत ! (निरागसतेच्या रूपातला)
सामील होतो पक्ष्यांच्या किलबिलाटात
रमून जातो हरिणांच्या सहवासात;
करू शकत नाही, शिकला सवरलेलाही,
करून टाकतो हा सहजसाध्य तेही !

व्यक्तित्व याचं इतकं सहज सुंदर-
की उत्स्फूर्त वर्षाव होतो
लोकांच्या सदिच्छांचा,
केला यानं देवाचा धावा
की देवही येतो सत्वर धावून
घेतलं याच्या मनानं
की प्रसन्नता येते फुलून !
युगानयुगे जातात लोटून

काळापासून तो सदैव बंधमुक्त;
अनंतात त्यानं मांडलाय ठाण
सुख काय, दु:ख काय-
काय मान नि काय अपमान ?
त्याला दोन्ही समसमान !
मनाला लावून घेत नाही;
पर्वा त्याची करीत नाही.
तो एक मधुर दंवबिंदु !
कोवळ्या सुकुमार जीवनाचा जीवंत झरा !!

आपल्या मुग्ध हास्याला
जेव्हा करून देतो मोकळी वाट,
आनंदसागर भरून जातो काठोकाठ !

## ३२. "क्रोध"

षड्रिपूत अग्रेसर - क्रोध !
एक गांधीलमाशी - जळजळीत नांगीची
फक्त एकच चावा - नि हादरून जातं काळीज.

एक कटाक्ष क्रोधाचा - थरारतं शरीर
जहाल हालाहल - आतल्या आत खदखदणारं !
एक जीवंत ज्वालामुखीच,
लावारस ओकणारा
खडकचे खडक गडप करणारा !

शांती
(हिच दुसरं नाव शीतलता)
मुलायम पाझरत
हिरवळीवर पसरत
सुखावणारा हिमच !

क्रोध !
सैतान, थेट नरकातून प्रकटलेला !
मानवांच्या हृदय सिंहासनावर -
आरूढ होण्याच्या सुसंधीची वाट पहात -
तत्परतेने टपून बसलेला;

एकदा का घुसला आंत
असतो निमित्ताच्या शोधात,
बघता बघता घेतो कब्जा मनाचा !
भल्या बुऱ्या परिणामांची -
नष्ट होते आकलन-शक्ती;
सुरू होते थैमान
उन्मत्त साम्राज्याचे !
सरलता नि निरागसता,
जातात कुठल्या कुठं निघून.
भरून जातो नसानसात
त्वेषयुक्त द्वेष,
नि लाहीलाही करणारा जळफळाट.
अति निर्दय नि क्रूर पशूचा अवतार -

- हा क्रोध -
मानवतेच्या छाताडावर
करतो तांडव नृत्य;
हिरावून नेतो माणसाचं मनुष्यत्व !
सारं जग पेटलेलं,
जीवांचा चाललेला थरकाप,
अन् हा मूर्तीमंत सैतान
बेमुर्वतपणे बसलेला
सतारीच्या तारा छेडीत !!

 

## ३३. "रजनीकांत"

झळाळत्या चांदीची काया-
धारण केलेला महनीय महात्मा
"चंद्र" म्हणजे...
साक्षात् गाढ गोठलेली शीतलता !
स्तब्ध मुग्ध संगीतानं धुंद-
विहरतो आकाशात युगानयुगे स्वच्छंद!

काळोख करतोय नर्तन
याच्या चांदण्यात;
होत असतो प्रसन्नतेचा वर्षाव,
याच्या चकाकण्यात;
त्याच्या ध्यासरूपी श्वासानं-
मनाच्या वेदना जातात शमून !

त्याच्या सुखद दर्शनानं-
जाते काळजातून
काळजीची काजळी झडून !!

मानवी वस्त्यांच्या कोंडवाड्यापासून
दूर डोंगर पर्वतावर
अथवा विशाल समुद्रकाठी,
पिठोरी चांदण्यात, दंग नाहण्यात-
असतो बसलेला एखादा कवी
मनरंजनासाठी गुणगानाची कवने रचणारा-

ध्येयभान विसरलेला,
अंतर्बाह्य माधुर्यानं मुसमुसलेल्या
एखाद्या टपोऱ्या गुलाबासारखा
परमोच्च आनंदी आनंदात डोलणारा !!
रजनीकांतानं पाझरलेलं,
ब्रम्हांडातलं दिव्यामृत प्राशन करून,
चिरंजीव होण्याच्या निश्चयात -
निश्चल स्थितीत आपल्याच तंद्रीत
आहे तो कवीराज !

## ३४. "रात्रीची सम्राज्ञी चंद्रिका"

रात्रीच्या खजीन्यातलं अनमोल रत्नं
रात्रीची अघोषित सम्राज्ञीच !
काळोखाच्या सरोवरात -
एखाद्या कमळाप्रमाणं उमलणारी,
शीतलतेनं चिंब झालेली-

प्रकाशाची लावण्य लतिकाच-
रात्रीची सम्राज्ञी चंद्रिका !
गूढतेचं माधुर्य ल्यालेल्या सुखाचा
मंद सुगंध-
अंग प्रत्यांगातून प्रक्षेपित करणारी,
स्वर्गसृष्टीची रूपयौवना-
"रातराणी चंद्रिका!"
ऐहिक सुखापासून अलिप्त-
नि पारमार्थिक सुखानं युक्त !
त्यामुळं शुद्ध पावन अशी.

एक जादुची कांडीच !
आपल्या निशामय स्पर्शानं
जगाला नि मनाला
आणखीन् गहनतेत
नेऊन ठेवून देणारी अशी !!

अशात रंग करतात धारण
नवनवीन वर्ण
धूसर होतं रेखीव आकृतींच रूप
जणू चढाओढ लागते वस्तु-वस्तुत
धूसर होतं दैवी आकृत्यांचं रूप.
अहमहमिका लागल्याच जाणवतं वस्तु वस्तुत
दैवी अस्तित्वाची अनुभूती घेण्यासाठी
न कळत शिरतं मन,
अज्ञात अदृश्य जगात-
स्वत:ला करतं मुक्त
दिवसातल्या बंधनातून

कदाचित प्रेमाच्या ओलाव्यामुळें
कदाचित अतूट श्रद्धेमुळं-
दुसरा कुणी पोहचू ही शकणार नाही
अशा उच्च स्थानावर पोचतं हे मन-
जिथं प्रकृती होते विलीन,
नि नाचू डोलू लागतो जीवात्मा !!

## ३८. "बाळ"

मनाला रिझविणारा
कर्णमधुर खळखळाट करीत
नदी पावते उगम डोंगर कपारीत.
दुथडी वाहत दऱ्याखोऱ्यातून
वाटेत पसरलेल्या गवताच्या
एकूण एक पात्याला स्पर्श करीत
त्यांच्यात जीव ओतून-
बहाल करते दिव्य जीवनाचा आनंद !
किती अत्युत्तम तिचं हे काम !

घराघरातूनही होत असतो उगम
जीवन सरितेचा.
"बाळ" म्हणतो आपण तिला.
लाघवी हास्याचा साक्षात् अवतार !
चैतन्यानं भरभरलेली सुकोमलता,
दुथडी वाहणारी निरागसता,

अशी ही बालमूर्ती
बाल जगात गाजवते कीर्ती !
अणुगोळ्यापेक्षाहि बलशाही,
सहस्त्रावधी शस्त्रास्त्रांची-
एकत्रित ताकत बाळगणाऱ्या-
मूर्तीमंत क्रोधाला नि कटु शत्रुत्वालाही -
ताळयावर आणणारं,
त्याना नेस्तनाबुद करणारं
त्याचं मंद स्मित
भारी प्रत्ययकारी !

मानवी कळी ही
खुलली रे खुलली मंद हास्यानं
की युद्धेही पावतात विराम
दूर होतं चितांचं सावट
नि विद्वेष कोलमडतो मूळासकट !

## ३६. "निद्रेतून एक दृष्टिक्षेप"

गाढ निद्रा - अर्थात...
बूड नसलेल्या खोलात-
घेतलेली खोल बुडी.
सर्वत्र चिडीगुप अंधार;
ज्ञानेंद्रियांचा दीप तूर्तास पुरता मावळलेला
दृष्टीला काही पडत नाही;
बघण्याची क्रियाच कुठेही नाही
विचारांचे, भावनांचे, कामनांचे ओहोळ विलीन झालेले !

शून्याच्या महासागरात !
सारं कसं शांत, निश्चल, स्तब्ध !
कटकटींच्या फरफटीपासून-
मुक्त अस्तित्व !
तशात मी असतो तिथेच आत,
पण नसतो माझ्यातला ''मी'' तिथं.
''मी'' बनलेला अचेतन
पुनश्च होण्याकरिता ''स्वप्नसृष्टीत'' चेतन,
-जगण्याकरिता तिथलं अमर्याद जीवन !
गुण-दोष, साहस-भीती,
नष्ट झालेले लाटांप्रमाणं;
विरून गेलेले वाफेप्रमाणं
मुक्त झालेला मी सांसारिक कटकटीतून-
नि अनंत घालमेलीच्या फरफटीतून !
दृष्टीआड झालेलं-
काळांच पाणी, निद्रेच्या वाळूत !

बुद्धीभेद करणारे
जातीय वाद - वितंड वाद
''इझम'' चे वादविवाद
जणू निखळून झळाळत
कायमचे दृष्टीआड झालेले तारे !

निद्रादेवी,
तू मरणातलेही भावणारे मरण!
ओठ मायावी तुझे-
स्पर्श करतात माझ्या पापण्यांना
डोळ्यांना येते झापड
ब्रम्हानंदी लागते टाळी
नि आत्मा होतो बंधमुक्त !!

# ३७. मन - एक समंध

विचार करता होते
मानवी मती गूढ
मानवी मन एक
न उकलणारे गूढ !
ना रंग ना रूप ;
ना आकार, असं वावरणारं-
एक अदृश्य भूत !
बासरी तर नसते दिसत
पण ऐकू येत असते धून,
माहीत नाही कुठून !

शोध मनाचा घेण्यासाठी
बऱ्याचदा डोकावतो मी आंत
जसजसा मी जातो खोल
तसतसं तितकंच जातं
खाली रूतत तेही खोल;
माझे भगीरथ प्रयत्न ठरतात फोल !
काळोख तिथला करतो गिळंकृत -
माझ्यातला ''मी'' !

''मी'' जेव्हा होतो नष्ट,
मनाला येतो, बहर
पण मन जेंव्हा होतं अचेतन,
''मी'' करतो कहर !
एक विचित्र गूढ-
शब्दांनी न उकलणारं !

ना भिंती आजुबाजुस,
ना याला काही वर, खाली;
फक्त खोलीच खोली!

काळगती येते शून्यावर
अंतराळही होतं नसल्यात जमा !
अस्तित्व हेच मनाचं वास्तव स्वरूप !

कोणतंही मन प्रत्यक्षात नसतंच !
तथापी.......
मन म्हणजेच अखिल जग;
मन म्हणजे, जे अस्तित्वात असतं
नि कालांतरानं
नाश पावणार असतं
-असं सर्वकाही !
अद्‌भुत भूत हे मन,
एक दैवी चमत्कार !!

 

## ३८. "दृश्यंच दृश्यं-पण दर्शकच नाही कुणी"

आत्म्याला उपशामक,
परमानंदाचा स्रोत,
सजगतेच्या दीपाला लागणारं तेल,
- अशी ही निद्रा....
जर झाली डोळ्याजवळ फिरकेनाशी,
तर रात्रीचा होतो नरक
नि दिवस तिची पडछाया !
विभक्त होतो माणूस,
ॲरिस्टॉटलच्या तर्कशास्त्राचे वर्चस्व असलेल्या -
वैचारिक जगापासून !

नि तिथं, त्या क्षणीच सुरुं-
"अ" हा "अ" आहे, आणि नाहीही;
"अ" हा "ब" आहे,
किंवा "ब" नसलेला "ब" !
अथवा नसावा दोन्हीपैकी कोणताच !!
जर "अ" असेल खरा
तर "अ" असू शकेल खोटाही !
अशा तर्क वितर्काच्या भोवऱ्यात
घरंगळू लागतं जग दिशाहीनपणं !
पूर्व नि पश्चिम
वर अन् खाली
जवळ नि दूर
यातला फरकच होऊन जातो दूर.
कुठे काय, होते कळेनासे
होतात दवबिंदूप्रमाणे नाहीसे !
माणूस तरतो, तरंगतो, उडतो
एकाच क्रमानं.
गातो, ओरडतो, किंचाळतो
एकाच दमात - निद्रेच्या अभावानं !
स्वर्ग नि नरक, मित्र नि शत्रू,
चांगलं अन् वाईट, जीवन नि मृत्यू,
लागतात एकमेकाभोवती भिरभिरू !
उरत नाही स्थिर असं कांही
होत नसतं परिवर्तन कशाचंही !
सर्व काही ज्याच्या त्याच्या
अस्तित्वातच बसलेलं असतं दडून खोल.
हेच नव्हे का खरं स्वरूप या जगाचं ?
नव्हे का प्रवेश द्वारच सत्याच्या साम्राज्याचं ?

ज्यावेळी पापण्यावर झापड आली नसते
निद्रादेवी प्रसन्न झाली नसते
तेव्हा मन नि ज्ञानेंद्रिये -
भरकटतात, तऱ्हेवाईक बनतात
मारू लागतात फेऱ्या स्वप्नलोकात
सगळे आवाज-
घनरूपात होतात साकार;
विचारांना येतो आकार.
भावनांची लागते विल्हेवाट-
सकाळच्या पूर्वरंगाची लागते तशी !
आशा, आकांक्षा बनतात दिशाहीन
सरमिसळतात, होतात अर्थहीन !
असतो का मी तिथं अशा अवस्थेत ?
असेन तर, कोणत्या स्वरूपात ?
मी खचितच जगत असतो तिथं
कशाशा विचित्र स्वरूपात;
किंबहुना जगत असतो भुताच्या रूपात!
नुसती कल्पनारम्य दृश्यं !
त्यात रममाण होणारा नाही कुणीच !!

❑ ❑

## ३९. मृत्यू

मृत्यूसमान निर्विवाद खरं
दुसरं कोणतं आहे बरं?
दिवंगत झालेले सर्व

या सत्याचे आहेत साक्षी;
नि हयात असलेले सगळे
होणारच आहेत भविष्यात
सहभागी या साक्षीत !
इतिहास म्हणजे...
स्मशानभू वरील चिरशांतिकांची गाथा !
वाचायला झाली सुरवात
तर वाटू लागतं हमखास
कि मृत्यू घोटाळतोय आसपास !
भूतकाळ म्हणजे मृत्यूचं साम्राज्य !
भविष्यकाळ-जीवन जगणाऱ्याच्या आवाक्या बाहेर !
वर्तमान असतं जरूर
पण असतं क्षणभंगूर !
म्हणून तर म्हणतात...
जीवन म्हणजे-
दिवा विझण्यापूर्वीचा
बिन भरवशाचा प्रकाश !
मृत्यू म्हणजे -
अनंत, असीम, काळोख !
चिंता नि भय, आधी नि व्याधी,
प्राणांतिक वेदना, दुष्काळ, महापूर
युद्धे, तंटे, बखेडे इत्यादी
एक ना दोन, हजारो कारणानी
वाढतो ताण तणाव
नि आयुष्याचं होतं खोबरं !
मृत्यु करतो यातून झटक्यात मुक्त
मग सर्वत्र नांदते चिरंजीवी शांतता.
नि टिकून राहते

काळ नि अंतराळ रहित स्तब्धता !
या चिर शांतीची
माझ्या मनानं जर केली कामना
तर किमाश्चर्यम् !

 

## ४०. घालमेल

माणूस खचितच एक प्राणी !
कुत्र्या मांजरासारखा-
भांडण उकरून काढणारा
कारण असतं बव्हंशी निमित्ताला,
त्याची किंमत मात्र
मोजावी लागते भरपूर त्याला !

जीवन म्हणजे-
स्वर्गागत अमुल्य दैवी उपहार !
पण पुरे या प्राण्याला
फक्त एक अपशब्दोच्चार !
पाणी सोडेल त्या उपहारावर,
परिणामांचा न करता विचार !
जीवनाच्या रक्तलांच्छित रणभूमीवर
गमावून बसतो माणूस
कधी नाक, कान, डोळे
धन, दौलत, सगे-सोयरे
नि प्रीती, नीती, मन:शांती !

चुकून येतो त्याच्या जिव्हेवर
एखादाच गोड शब्द
नि हालाहलाचे पूर मात्र
खदखदतात आतल्याआत.

माणूस मांडतो उघडा बाजार
सुंदर सुगंधी फुलांचा एकीकडे
राखुन ठेवतो भरलेले
गुप्त शस्त्रागार दुसरीकडे !
छे, छे,
स्नेहाच्या हृदय साम्राज्यावर
येऊन थडकते
लावारसाची जळजळती नागमोडी लाट !

□ □

## ४१. जीवन संगीताची कुणकुण

मुसळधार पावसानंतर,
सुरू झालंय मंडुकांच,
"डरांव डरांव" च संगीत -
जवळच्या जलाशयात.

होतं गायब, बऱ्याच कालावधी पर्यंत;
टपकलयं अज्ञानातून एकाएकी.
नव्या पाण्याची करामत ही!
मृतवत् मंडूक रसरसलेत नवजीवनानं;
विहरतायत नवचैतन्यानं.
त्यांच्या आवाजात जाणवतोय

आता स्नेहाचा ओलावा;
त्यात भरीस भर उत्साहाची!
त्यांचा "डराव डराव"
त्यांच्या परता त्यांना गोड!
गोडात गोड, अत्यंत गोड.
एकमेकांना देतात प्रतिसाद-
अत्युत्साहानं डराव डरावच्या भाषेत
बेंबीच्या देठापासून !!
सुरू होतो त्यांच्यासह-
त्यांचा जीवन प्रवाह-
नवजीवनाचे धागे एकमेकाशी जोडीत !
चैतन्यमय संगीताचं स्वरैक्य
निरंतर साकारतं वंशसातत्य !
त्यांचा डराव डराव त्याना "ॐकारच" !
उत्पत्तीचा मूळ स्रोत!
संगोपनाचा पाळणाच !!

❑ ❑

## ४२. यंत्र

यंत्र....
वास्तवात निर्जीव जडवस्तु;
किंतु अदृश्य समंधानं झपाटलेलं-
गरगरतं, धावतं, उडतं,
तरंगतं, ओझी वाहतं, झेपावतं,

प्रकटतं असंख्य रूपात.
दृष्टीक्षेपात नसणाऱ्या ग्रहगोलावरही
पाठवतं बिनतारी संदेश !
ग्रहण करून वाचून दाखवतं तिथले प्रतिसंदेश !
आकाशातील असंख्य तारांच्या
जडणघडणाचं रहस्य दाखवितं उलगडून !

आधुनिक तंत्रानी युक्त
विलक्षण शक्तीचं - हे यंत्र;
कळ याची मानवाच्या हाती!
मानवाचा आज्ञाधारक सेवक-
मानवाच्या आवाक्या बाहेरचही
सारं काही करुन टाकणारं !
आधुनिक सैतान,
मानवाच्या कल्पना शक्तीनं
निर्माण झालेलं यंत्र
केव्हा केव्हा धारण करतं,
रूप भस्मासुराचं!
उध्वस्त करून टाकतं
जीवन मानवाचं !
जाळून करतं बेचिराख-
निसर्गानं नटलेल्या वसुंधरेला;
नि घाला घालून स्वत:वर-
घडवून आणतं स्वत:चाच अंत !

 

# ४३. गांधीजी

उधळीत होती आकाशवाणी स्तुती सुमने;
भरत होती वृत्तपत्रे रकानेच्या रकाने;
बोलत होते लोक
राष्ट्रपित्याच्या स्तुतीत पोट तिडीकेनं;
खरा जगला हा महात्मा
लोककल्याणार्थ की हो जगला !
जणूं मानवीरूपातली नि:स्सीम प्रीती !
होता खरा गरीबांचा वाली
जीवन जगले लाखो लोक,
याच्या छत्रछाये खाली!
सत्याचे पैलू असलेला हा हिरा,
त्रिभुवनस्वामीच्या किरीटांत शोभणारा,
स्तुती सुमनांचा असा वारेमाप वर्षाव !

पण शेवटी....
भूतकाळ तो भूतकाळच !
गांधी नावाच्या सूर्याच्या-
दिगंत प्रखर प्रकाशानं-
तळपत होता तो काळ.
सूर्याचा झाला अस्त,
नि होत होत-
समस्त झालं अस्ताव्यस्त.
रेंगाळत नाहीये आता
एक ही किरण त्यातला;
पसरलाय रात्रीचा विदीर्ण काळोख !

कालच्या गांधीवादाच्या
नि:स्वार्थ देशभक्तीरूपी मेघानं

जनता जनार्दनाचे हृदय सागर
असतील काढले तुडुंब भरून
पण हाय !
गेला तो मेघराज
मी झालोय तहानेनं व्याकुळ आज.
हे मेघा, ममतेच्या मेघा
माझ्या आर्त प्रार्थनेचा स्वीकार कर;
पुनश्च मायेचा वर्षाव कर.

मेघ मायेचा हसला अज्ञातातून !
मला जाणवलं ते शून्यरूपात !!

 

## ४४. भ्रमविलास

जग म्हणजे...
काहींच्या दृष्टीनं एक स्वप्न,
काहीना स्वर्ग,
नि काहींच्या मते नरक;
सारं काही अज्ञातातून
उद्‌भवलेलं थोतांड !

परिवर्तन शीलतेचा मारक वारा-
वाहत असतो भरधाव,
अवकाशाच्या कड्यावरुन;
काळ थरथरतो,
अंतराळ होतं कंपायमान;
स्वत:चं स्थिर अस्तित्व नसलेल्या

अनेकानेक वस्तु-
प्रकटतात नि नाहीशा होतात.

विभोर नाचणारा मोर
मनरंजन करणारा गवैया छचोर,
मोहक सुगंधी फूल टपोरे,
कोलमडतात सारे चे सारे
नि, न ठेवता मागे नामोनिशाण !
जीवनाच्या रंगभूमीवरुन -
करतात कायमचे प्रयाण !

ह्या रंग छटा मनोहारी
विविध वस्तु विविधाकारी,
थडकतात येऊन अज्ञातातून;
टाकतात मानवी मनाला भारावून

नि जिथं आहे कायमचं साम्राज्य
पोकळीच्या अस्तित्वाचं
तिथं-त्या अंतर्मनात
उद्दीपित करतात भावना !
नि विचाराना देतात चालना !!

## ४८. जगा तुझी रीत न्यारी

कुठे कशाला नाही धरबंद,
ही दुनिया अशी बेबंद;
विचित्र आभासानी भरलेली

विवेकशून्य बनलेली;
जडवस्तुनी तुंबलेली !
इथं अस्तित्वात असलेले मानवी कायदे
करु शकत नाहीत कुणाला काही !
कुणावरही त्याचा वचकच नाही !!

इथं उजव्याला म्हणावं लागतं डावं
उभं असलं तरी आडवं !
चांगल्या वाईटातला फरक कळायला
चांगलं राहिलंय कुठं ?
चांगल्या वाईटाची सरमिसळ झालीय;
सारं कसं गोड गोड,
वाटावं अशी परिस्थिती आलीय !.

तुम्ही करता इथं खून
नि निलाजरे हसता;
आवळला कुणी गळ्याला फास
तरी तुम्ही कोडगं हसत बसता !
काळाचा चालला असतो अनिर्बंध खेळ;
कधी पावतो तो आकुंचन
नि ढकलून देतो शतवर्षांना
एका क्षणाच्या पोटात !
कधी तो पावतो प्रसरण,
नि क्षणाला बनवितो युगा एवढा मोठा !
तुम्ही बद्ध आहात
की आहात मुक्त ?
तुमचं अस्तित्व हे तरी सत्य ?
की तेही मिथ्या ?

शून्याचं कायमचं अस्तित्व
हेच एकमेव अंतिम सत्य !!

❑ ❑

# ४६. जीवन प्रवास

पाळण्यावरचा पडदा जातो वर;
जड-जीवाच्या अद्‌भूत युतीनं
साकारतं ''बाळ'' नावाचं चैतन्य,
हसरं-रडकं, बोबडं बोलणारं, खिदळणारं
अवतरतं रांगत रांगत;
चैतन्याचा हा प्रवाह
येतो वाहत काळाच्या भूमीवर.
फेस, बुडबुडे, तरंगलहरी
उद्‌भवतात वरचेवर
अनिश्चिततेच्या नि क्षणभंगूरतेच्या रुपात !

दृश्यं जातात पालटत;
बघता बघता हसत खेळत,
मायावी प्रीतीसंगे बाळ प्रवेशतं यौवनात
निरागस हास्याला चढतो कैफ
उन्मादक वासनेचा !
तो असो वा ती,
नाचू लागतात स्वैर,
इंद्रियसुखरुपी सैतानाच्या-
पावलावर पाऊल टाकत,
कधी देत धडक थेट-
हिमालयाच्या शिखराला,
तर कधी सूर मारत खोल-
मोत्यानी भरल्या समुद्रतळाशी;

आता त्याची मती जाते गुंतत
चमत्कृती जन्य कल्पना सृष्टीत.

हृदय राहते दंग सतत,
गोड गोड स्वप्ने रंगविण्यात.
माणूस बांधतो मंदिरं
स्वर्गीय सुखाची, मोठ्या उमेदीनं
नि टाकतो करुन उध्वस्त
तितक्याच उन्मत्तपणानं !
या त्याच्या विसंगत कृती
शौर्या-धैर्याच्या की मूर्खपणाच्या
हे ठरवायचं हातात आहे का कुणाच्या ?

काळ जातो पुढं सरत;
तारुण्य जातं ओसरत;
करड्या केसाचं, सुरकुतलेलं-
थकलं भागलं शरीर विसावतं एकदाचं
थडग्यावर कोलमडून !
उत्तरक्रियेच्या औपचारिकते प्रीत्यर्थ,
पुरतात थोड्या गोवऱ्या,
किंवा मूठभर माती, चार दोन चिंध्या कापडाच्या,
किंचित अश्रू, बरेच नक्राश्रु,
चार दोन फुलं - अल्पावधीत कोमेजणारी;
संपत सारं;
जातात सारे निघून-
एकट्याला सोडून;
दूरवर काळोखाला
निळ्या आकाशाच्या स्वाधीन करुन !
नाही सूर्य-नाही चंद्र !

असलं कसलं तरी हे नाट्य
संपतं अखेर शून्यात विलीन होऊन !

□ □

# ४७. मैत्री : ईश्वराची सर्वोत्कृष्ट निर्मिती

मित्र म्हणजे....
मूर्तिमंत हृदय, सहृदय हृदय !
ना अस्थि, ना मांसपिंड
काळाला तिथं प्रवेश बंद !
क्षण मैत्रीचे अमर्याद विस्तारतात
नेऊन ठेवतात काळाला अनंतात !

स्वार्थ, कृपणता पासून अलिप्त
नि सदैव राहिलेला पवित्र
मित्रस्नेह म्हणजे
त्या हृदयात तेवणारा-
मंगल नंदादीपच !
क्षुद्र भावनांचे
अहंभावाचे-
खोट्या प्रतिष्ठेचे अप्पलपोटे पतंग
येतात उडत अज्ञातातून;
मैत्रीरुपी दीपावर घालतात झडप;
दीप करतो त्यांना गडप
नि राहतो आपला तेवत !
माझा मित्र---
माझ्यापरता एक विशाल निर्मल जलाशय
मनसोक्त पोहता येण्यासाठी.
माझा सखा---
सुजलां सुफलां सखी धरित्री,
मैत्रीची मूळं खोल रुजवून-
मला टवटवी देणारी !

होतो एकरुप मित्राच्या सहवासात,
फरकच जाणवत नाही मला
स्वर्ग-नरकांत, जीवन-मरणांत !

हे प्रभो ! तू निर्मिलेल्या जगातील
तुझी सर्वोत्कृष्ट कृती,
ही निर्हेतुक मैत्री म्हणजे
साक्षात् तुझीच प्रतिकृती !

 

## ४८. ज्ञान

मनात दरवळणारा सुगंध,
भावणारा याचा गंध;
डोळ्यांना सुखावणारं, असं हे "ज्ञान";
जल जसं जीवाला आवश्यक
तसं ज्ञान देखील जीवाला पोषक !

ज्ञान विकसित होत कसं ?
क्वचितच त्याच ज्ञान मानवाला.
बाह्यजगातून ते अंतर्मनात प्रवेशतं
अंतर्मनातून बाहेर उसळी घेतं !
कुंभ जसं अमृताला-
तसं शब्द ज्ञानाला, ठेवतात साठवून !
ज्ञान करतं मोजमाप
माणसाच्या बौद्धिक कुंवतीच नि विचारांच.
नेऊन ठेवतं जीवात्म्याला थेट
अनादी अनंताच्या क्षितीजावर- !

तिथं अनुभवतो माणूस
अनंतत्वाच स्वरुप;
नष्ट होतो त्याचा अहंभाव
नि प्राप्त होत संताचं रुप !

ज्ञानाच्या माध्यमानं
दिव्य जीवनाच्या रुपात
परमेश्वराचं घडतं दर्शन.
हे जग म्हणजे
निरंतर गतिमान अशा
दिव्यज्ञानाच्या तरंग लहरी !!

 

## ४९. शब्द

शब्द ! शब्द ! शब्द !
सारं जग बुडून गेलयं शब्दात !
पृथ्वीवर, हवेत, वातावरणाच्याही पलीकडे
शब्द पोहोचतात तरंगत उडत,
वाहत वेगात, झपाटत.

जिथं जायला मन नाही धजत
इतक्या खोलवर पोहोचतात शब्द नकळत.
मर्यादित दृष्टीपथाच्या पलीकडे असलेल्या
निराकार, अनामिक वास्तवाप्रत
मानव पोहोचूं शकणार नाही, कदाचित;
शब्द मात्र त्या वास्तवाला
जखडून ठेवतात आपल्या बाहुपाशात, अलगद !

लौकिक दृष्टीला अदृश्य देव,
अस्पर्शित पवित्र आत्मा,
अन् निर्वाण सुद्‌धा,
सुखावत प्रवेश घेतात,
शब्दांच्या शानदार प्रांगणात !

दिव्यातिदिव्य दृश्यांच्या दर्शनांचा
लाभ घडवून आणतात, शब्द !
विशुध्द भावनाना
मोकळी वाट करून देतात, शब्द !

शस्त्रानी नव्हे, तर शब्दांच्या अस्त्रानी
युध्दं जुंपतात
नि जुंपलेली विरामही पावतात !

शब्द म्हणजे वाहनंच,
-घसरत नरकाप्रत नेणारी
किंवा उडत स्वर्गात पोहोचविणारी !
एकच शब्द - मानवाला बनवितो पापात्मा
नि एकच शब्द - त्याला बनवून टाकतो धर्मात्मा !
आकार याचा अणू एवढा
सामर्थ्य अथांग सागराचं !
शब्द कोशातच राहू दिलं याला प्रयोजन न करता
तर असतो निरागस, निरुपद्रवी, निर्जीव, दुर्बल.
नि काढलं याला बाहेर -
नि दिला अवकाश झोंबायला,
तर चैतन्य असं संचारतं,
कि करुन टाकतो उलथा पालथ-
-पर्वतानाही लाजविणारी !
प्रसंगी मन मोडून टाकतो शब्द

विरजण घालतो स्नेहसंबंधात.
काबूत ठेवतो देश प्रदेश !

ज्याना याचा माहीत असतो रोख नि मेख
ते देतात पृथ्वीवरील जीवनाला
सुंदर फुलांचं प्रारुप !
मग शब्दांना सुटतो सुगंध,
गाऊ लागतात दिव्यातिदिव्य गाणी,
खुळखुळत गुणगुणत,
फिरकी घेत आनंदानं नाचत,
दणाणून सोडतात आसमंत,
सौंदर्याला येतं उधाण !
नि हरपून जातं साऱ्यांचं भान !

 

## ५०. विचारवंतापेक्षा पारडं जड अनुभावकाचं

कित्येक वर्षापासून
कसल्याशा अज्ञातानं
लय बिघडवून टाकलीय
माझ्या अंतर्मनाची !
संवेदनांचा होतोय गोंधळ;
न्याहाळण्याची प्रक्रिया असते चालू
रंगांचा, आकृतींचा,
आणखीन बऱ्याच गोष्टींचा

कसासा आभास
निर्माण होतोय मनात !

कशाचे असावेत हे आभास, ह्या जाणीवा ?
कुठं असावा यांचा केंद्रबिंदू ?
आहे काय असं बाह्यजगात-
ज्याबद्दल काही वाटावं अंतर्मनांत ?
उत्तर आहे सोपं पण संदिग्ध,
वरवर स्पष्ट वाटणारं,
पण न पटणारं !
बोधशक्ती म्हणजे -
अज्ञाताच्या नि खोल काळोख्याच्या -
अंतरहीत गुहेत सतत वावरणारा
एक छोटा दीप !
तिच पुरतं समाधान म्हणजे
केवळ एक गोड स्वप्न,
कधीच न साकारणारं !

म्हणून विचारांच्या गुंत्यात
व्यर्थ नाही अडकायचं.
अनुभूती घेत,
अनुभावक बनून रहायचं !
मग ज्ञात-अज्ञात सगळ्याच गोष्टींची
यायला लागेल अनुभूती;
होऊ लागेल जाणीव !
हे जग आहे अनुभावकांच धाम !
बुध्दीवाद्यांचं नाही इथं काही कामं !!

## ८१. भ्रम

आकाशाचा नीलिमा
पृथ्वीची स्थिर वाटणारी स्थिती
छोट्या ताऱ्यांचं चमकणं
वरवर वाटते हीच वस्तुस्थिती.
थोडं खोलांत जाऊन,
केला प्रयत्न अजमावण्याचा ... तर,
द्रुतगतीने पळताना दिसतील ते स्पष्ट!.

''जादुची कांडी'' असं म्हटला जाणारा काळ
असं काही नकळत
फिरवतो हात मनावर व जड वस्तुंवर
की त्या येतात अस्तित्वात,
नि कालांतरानं होतात नष्ट
उषःकालच्या धुक्याप्रमाणं !

हा सूर्य नि चंद्र, अणुं, जीवाणूं;
अळवावरचे दवबिंदू जणूं;
सुख-दुःख, यशापयश,
हे धूसर मेघ, स्वप्नसृष्टीतले !
''या साऱ्यांची अनुभूती घेणारा
असा कोण आहे तो ?''
या यक्षप्रश्नानं खाल्लीत हजारो वर्षं
तथा कथित बुध्दीवाद्यांची, विचारवंतांची !
उत्तरच सांपडत नाहीये
या अडचणीत टाकणाऱ्या कोड्याचं;
कारण वरवर वाटणारं हे कोडं -
म्हणजे भ्रम आहे, निव्वळ भ्रम !

 

## ५२. रजई

गुलाबी थंडीच्या वेळचा -
एक उपयुक्त जोडीदार !
गतकाळच्या आठवणींचा
एक सूक्त उपहार -
अशी ही रजई .....
पिढ्यान् पिढ्यांची आठवण जपणारी
''जुनं ते सोनं'' हे सार्थ पटविणारी
-मऊशार, ऊबदार !!

थकला भागला जो विसावतो -
हिच्या कुशीत,
गोड स्वप्नात रंगून जातो तो
मोठ्या खुशीत !
निसर्ग छटा जशा दृष्टी आड होत,
जातात विस्मृतीत, धुकं पसरताच,
तशा वृथा चिंता, कटकटी नि आपत्ती
पसार होतात, रजई अंगावर पसरताच !

नितांत स्नेहानं नि भावणाऱ्या काळोखानं
चिरस्थाई भुरळ पाडणाऱ्या अद्भूत दुनियेत
सुखेनैव विहरत असतो माणूस -
रजई पांघरल्या वेळी
निद्रा स्वयं बनते मऊमऊ उशी
स्वप्नसृष्टी भासते सत्यसृष्टी जशी.
पंख फुटतात त्या माणसाला,
नि नेऊन ठेवतात त्याला -
त्या स्वप्नसृष्टीतून त्याच्या इप्सित स्वर्गसृष्टीत !

मानवी जीवनाला
हळुवार जादु-ई-स्पर्श करणारी -
अशी ही रजई !

 

## ८३. आहार-जीवनाधार

अन्न,
जीवाचा जीवनाधार !
जसा मेणबत्तीतला मेण !
स्नेह अथवा द्वेष
सुख किंवा दुःख
हे तर भाकरीवरचे पापुद्रे,
नि दुधामधील प्रथीन !

बालकाच्या निरागस डोळ्यांत -
दिसणारी लोभसवाणी चमक,
युवकाच्या पीळदार स्नायूत -
सळसळणाऱ्या गरम रक्ताची धमक,
तल्लख मेंदूतून परजणारी विद्वत्ता,
सिध्दऋषींची दिव्य दृष्टी नि बुध्दीमत्ता,
कवीची वांङमयीन सौंदर्यानं
नटलेली संवेदनशील प्रतिभा
ही आहे करामत
भात-भाकरीची !
पळे-भाज्यांची !!

हा मानव आहेच मुळी
काळ्या मेघातून झळाळत आलेला
शुभ्र कणिकाच्या रुपानं झळाळणारा !
जीवनाचा चैतन्य प्रकाश !
काल आख्खा दिवस मी अन्नाविनाच राहिलो
पाणीसुध्दा नावालाच प्यालो,
भर रणरणत्या मध्यान्ही
काळोखाच्या ढगानी
घेरुन टाकलं माझ्या दृष्टीला !
चमकू लागले काजवे !!
लांब दूरवरच्या परिसरात
जिथं जीवनाची पडते मृत्यूशी गांठ,
जिथं क्रिया होऊन जाते निष्क्रीय
जिथं प्रकाशाचं होतं विसर्जन अंधारात,
त्या तिथं माझं मन
घालू लागलं घिरट्या !

माझ्या आवडत्या विचारधारा मंदावल्या,
माझ्या गोड आशा आकांक्षा थंडावल्या.
अनेक वस्तु येत राहिल्या नजरे समोर,
पण ठसा नाही उमटला एकाचाही अंत:पटलावर !

डोळे विस्फारुन अचेतन बसलेला मी !
मीच एक धडधडीत पुरावा -
"मेलेल्यांचा की जीवितांचा" -
या संभ्रमात असलेला !
आलो मी मनासहवर्तमान परतून
अस्तित्वाच्या अंतरहित गुहेत !

माझ्या या अवस्थेचं,
माझं मलाच आलं हंसू !
ते ऐकायला मात्र -
दुसरं कुणी नव्हतंच तिथं जवळपास !

❑ ❑

## ५४. कथा नि व्यथा पांढऱ्या केसांची

लहानगं बाळ निरागस हसतं;
मऊपणाचा मूर्तिमंत अवतार - त्याचे केस,
चमकतात सोन्यासारखे,
विशद करतात कथा - सोनेरी स्वप्नांच्या.

तरुण नाचतो तरा तरा
वासनेच्या नि प्रेमाच्या तालावर,
हसतात त्याचे केस फिदी फिदी
ऐकवतात कहाण्या मर्दुमकीच्या;
भिरभिरतात हवेत
भावनाना हेलावून, ठेवतात नेऊन
स्वर्गाच्या ऊंचीवर !
केस त्याचे, काळ्या स्फटीकाप्रमाणे चमकणारे
असतात भटकंती करत कालातीत काळात.

"आता झालो मी म्हातारा"-
कुरबुर करतो तो;
वर्षानुवर्षं, उन्हाची तिरपीट, सोसून सोसून,

त्याचे केस होतात पांढरे फटफटीत.
तारतम्याचा निर्णय घेण्याचे
दिवस येतात आता.
तारुण्याची रात्र संपलेली
शहाणपणाचे नि अनुभवाचे
शिक्कामोर्तब होते पांढऱ्या केसावर !
पण नको वाटतं हे शिक्कामोर्तब
त्याच्या अंतर्मनाला !
कितीतरी पटीने गोड वाटतो त्याला,
तारुण्याचा खुळेपणा
त्या पांढऱ्याच्या शहाणपणापेक्षा !!

 

## ५५. संस्कृत

अत्युच्च ध्येय गांठण्याची
महत्वाकांक्षा बाळगणाऱ्या
सुसंस्कृत महात्म्याच्या गरजांच्या
चौकटीत बसण्यायोग्य
परिशुद्ध मृदु नि समृध्द
अशी ही संस्कृत भाषा !
असं म्हणतात की
ती मृत झालीय शेकडो वर्षापूर्वीच.
असं वाटत बऱ्याच लोकाना की

जनसामान्याच्या हृदयाला,
दिलासा द्यायच्या उद्देशानं
जगली नाही ती कधीच.

मला मात्र वाटते ती जगावेगळी;
अखंड वाहत आली आहे ती -
पवित्र गंगेप्रमाणं -
जे काही व जे कोणी
संपर्कात आले त्यांच्यावर
पवित्र संस्कारांचा अभिषेक करीत !

आत्मा तिचा स्त्रोत;
नि परमात्मा तिचं मुख !
पावित्र्यातून पावित्र्याकडेच
वाटचाल करणारी .....
अशी ही अत्युत्तम भाषा
पर्वतराज गौरीशंकरा समान -
महान् संतांसमान स्थित आहे -
पवित्र तंद्रीत, निरंतर !

वर वर दिसते ही
सर्वतोपरी मृत झाल्यागत;
पण तिचं खरं अंतर्गत
स्वरुप आहे राज हंसागत.
परमार्थाच्या उदात्त सरोवरात
हळुवार नि संथपणं विहरणारा
डौलदार राजहंसच !

 

## ५६. कान वाचतात

घडू लागतात जेव्हा विलक्षण घटना
नेहमीच्या चौकटीत न बसणाऱ्या,
तेव्हा उखडून पडतो पायाच तर्क शास्त्राचा !
येईल काय असं कल्पनेंत तरी
कि डोळ्यांनी घेता येतो वास ?
नाकानं बघता येतं,
नि काननी वाचता येतं हमखास ?
म्हणालं कुणी असं,
तर म्हणतील लोक
करतोय हा मूर्खासारखा बकवास.

पण इथं आहे अशीच काहीशी
अत्यंत खळबळजनक खबर !
सकृद्दर्शनी अशक्यप्राय वाटतात ज्या गोष्टी
त्या सरल स्वाभाविक नि सहजशक्य वाटतात,
काही निरागस नि कोवळ्या वयाच्या चिनी मुलींना.
त्यांच्या सर्वांगावर आहेत डोळे,
ज्यांना स्पर्शताच त्या पाहू शकतात.
कागदाची घडी न उलगडता
त्यातला मजकूर त्या उलगडून सांगू शकतात.

संदेशाचं भेंडोळं ठेवताक्षणी कानात
संदेश वाचू लागतात कान
त्याना बसवलं तावावर
तर तावाखालचा संदेश

येवून पोंहचतो त्यांच्या त्वचेवर !
मिटण्याच्या मार्गावर आहेत रूढी, परंपरा;
घडू लागल्यात नव्या नवलाईच्या -
थक्क करणाऱ्या अजब घटना;
घडवू लागलाय चमत्कार निसर्ग सुध्दा !
भाग्य लाभलंय माणसाला,
याचा आनंद लुटण्याचं -
जवळच्या भविष्यात.
जेव्हा कोलमडून पडतात -
तर्क शास्त्राचे जुने नियम,
तेव्हा लडखडून जातं -
मानवाचं बुध्दीचातुर्य !
दूर नाहीये तो दिवस आता !

 

## ८७. श्रध्दा

श्रध्दा हेच जीवन;
अभिरुची निर्माण करते श्रध्दा - अंत:करणात;
माधुर्य ओतते भावनांत;
आशेचे किरण पसरवते मनात !
आतल्या आत जखडला गेलेला हा माणूस
रंगलेला असतो चिर स्वातंत्र्याच्या स्वप्नांत !
''पापी पडतो जन्म-मरणाच्या फेऱ्यात;
स्वर्ग सुख पडतं पुण्यवानाच्या पदरात !

संत पोहोचतो
या दोहोंच्या पलीकडच्या जगात !''
या नि अशा -
अनिर्बंध नि निराधार विचारधारावर
विश्वास ठेवायला, -
बाध्य करते श्रध्दा !
प्रीतीचे नि भक्तीचे
द्वेषाचे व मत्सराचे
उभारले जातात वाळूचे किल्ले
श्रध्देच्या वाळवंटात !

कल्पनेनं भरलेले सिध्दांत,
काव्योन्मादाला मिळालेली स्फूर्ती,
शिलावर कोरलेले मानसन्मान पदव्या,
शाब्दिक स्तुतीनं भरलेली कीर्ती
इत्यादीनी .....
उद्युक्त होतो मानव
अमरत्वाची स्वप्ने पहायला !

श्रध्देनं माणूस होतो इतका वेडापिसा
कि, त्याचं स्वरूप
त्यालाच होतं कळेनासं !
- तो देव की दानव ?
अमर कि मर्त्य मानव ?

आंधळी श्रध्दा जेव्हा पावते विलय
नि सत्याचा होतो अभ्युदय,
बंधमुक्त झाल्याचा ब्रम्हानंद लुटतो - मानव !

□ □

## ५८. पोकळ स्तुतीनं भरलेली कीर्ती

जगात स्तुती पाठकांचा भारी थाट !
स्तुतीचा शब्दकोश याना तोंडपाठ !!
सांगतील स्तुतीपर गोष्टी लाखो हे भाट !
चढवतील एखाद्याला हरबऱ्याच्या झाडावर
उभारतील त्याचे पुतळे चौका चौकावर !
जातो हा जिथं जिथं
दिसतात त्याला तिथं
लाकडी चौकटीत बंदिस्त केलेल्या
नि दर्शनी भिंतीवर टांगलेल्या
त्याच्या भव्य तसवीरी -
पुष्पहारानी मढवलेल्या, थाटानं सजवलेल्या !

"मानव कुळातला तळपता सुर्य,
याची कीर्ती-
- सूर्य प्रकाशापेक्षाही लांब पल्ल्याची
सूर्यापेक्षाही जास्त प्रकाशणारी !
मानव कुळातला हा दुर्मिळ हिरा,
दिसला नाही कधी भूतकाळात !
नाही होणार उपलब्ध कधी भविष्यांत."
अशी करीत राहतात, ते अखंड -
- स्तुतीपर शब्दांची बरसात !
उधळलेल्या स्तुतीसुमनानी
फुगून गेलेला माणूस
बसतो स्वत:ची कुंवत विसरुन !!
जातो स्वत:ला कुणी मोठा समजून !
सत्यस्थिती दुर्लक्षिली जाते
नि कायमची राहते दडून !

त्याचं जीवन बनतं केवळ,
त्या पुतळ्यातला दगड
त्या तसवीरीतलं लाकूड
नि स्तुतीतला एखादा दुसरा शब्द
ते राहतात बेफिकीर आरामांत !
हा तोडत असतो जीव त्या तिन्हीकरता !

काळ जातो लोटत
ऋतु जातात पालटत.
वसंताचा बहर संपलेला;
पश्चिमेच्या डोंगर कपारीत -
सूर्यही दडून गेलेला !
जिथं होतं प्रकाशाचं साम्राज्य,
तिथं प्रवेश घेतलेला
गडद काळोखानं, चोर पावलांनीं.

आता तो येतो निवृत्तीला
नि होतो पायउतार.
त्याचं नाव प्रतिमा नि तसवीरी
कचरापेटीत धूळ खात पडलेली -
उघड्या डोळ्यानी पहात असतात लोक़ !

उतार वयाच्या अवतारात
झोकांड्या खात,
फिरकत असताना आसपास,
एक बेवारशी कुत्रं,
त्याचीच तसवीर कुरतडत
गुरगुरतं त्याच्यावर !
रडकुंडीला आलेलं असतं
त्याचं बेगडी व्यक्तिमत्व

नि हसत असतं त्याला
त्याच्यात हृदयातलं सत्य!!

कोसळतो तो;
धुळीत मिळतं त्याचं काळीज.
मेला तो असं समजून
मोकळे होतात लोक,
त्याला शेवटचा हार घालून.
बिचारा कण्हतो, विलाप करतो;
स्तुतीपाठक ढाळतात नक्राश्रु,
हसतात कोडगेपणानं
नि जातात विसरुन त्याला कायमचं !

स्तुतीमुळं त्याच्या पदरात
नाही पडत काहीही !
तरी स्तुती लागते गोड नेहमीच हवीशी !
भूलोकामधलं अमृतच !

 

## ८९. ''कोण असावा तो ?

''कोण असावा तो ?''
''ते'' की ''ती'' ?
त्यानी वादविवाद निर्माण केलेत
निर्णयाप्रत पोचण्याकरिता;
लिहून काढलेत ग्रंथचे ग्रंथ

बाजू मांडण्याकरिता;
व्याख्याने झोडत आलेत
अनुयायांचे घोळके जमविण्याकरिता.

"ईश्वर" ह्या अदृश्य शक्तीला
पाहिलंय काय त्यानी, प्रत्यक्ष कधी ?
सागरांत विलीन होणाऱ्या नदीप्रमाणं
परमात्म्याशी एकरुप झालेले
ऋषीमुनी बोलतात जरुर त्याबद्दल -
मात्र फारच जुजुबी नि जरा जपूनच !

"तो ?" - होय तो "तो" च आहे.
"ती ?" - हो "ती" आहे.
अन् "ते ?" - "ते" असलेलंही बरं वाटतं बरं !
"याशिवाय आणखीन् काही ?"
वा ! "आणखीन काही" असल्याच
वाटतं जास्त खरं !!
क्रियापदं जशी गळून पडतात, निष्प्रभ होऊन,
तशीच होते गत -
भाषाशास्त्रातील या सर्वनामांची !
तो सदासर्वकाळ बोधशक्तीच्या आवाक्या बाहेर असल्यामुळे
सर्वसमावेशक "तो", "ती", "ते" मिळून म्हणा हवं तर !

ढग येतात नाहीसे होतात,
भडकत्या ज्वाला, लुप्त होतात,
तसं जे जे उद्भवतं, दृष्टिपथांत येतं,
त्याचा ऱ्हास होत, नाश होणारच !
हे नि:संशय ठरलेलंच !

पुरुषावस्था व स्त्री अवस्था
जीवावस्था किंवा मृतावस्था
या घटना आहेत क्षणभंगूर
पण घडत असतात -
एकसारख्या एकामागून एक निरंतर !

शरीराची व मनाची चालूच असते
क्षीण होण्याची प्रक्रिया;
बालपण, तारुण्य नि वृध्दत्व
एकामागून एक जातात निघून.
प्रेम, द्वेष, अहंभाव
लुप्त होतात छोटया मोठ्या लाटांप्रमाणं विरुन
भले बहाद्दूर ! असा उडतो सगळ्यांचा फज्जा !

"तो आहे एक मुलगा,
तो आहे एक तरुण;
तो आहे एक म्हातारा."
या संबोधनाला मुलगा - तरुण - म्हातारा
होतात गायब, जातात निघून !
मग टिकतो कायम , सर्वनामातला 'तो" -
अचेतन राहून !-
अस्तित्वातलं वास्तव म्हणून.
जसा आहे तसा
अनंत अवकाशात
राहून असतो तो, !
काळातीत असा !
"तूंच आहेस "तो" "ती" पैकी एक"
सहजगत्या उध्दारतो, ज्ञानी संत !

 

## ६०. दुखणें "संसार" नामक, त्याला निद्रा उपशामक

नाना तऱ्हेचे विचार
ठासून भरलेले डोक्यात;
तशात प्रवेश घेतो मी
माझ्या शयनगृहात.

अति भरगच्च भरलेल्या वाहनांत
प्रवाशांचा होतो कोंडमारा
नि जीव जातो गुदमरुन.
अति मानसिक ताण तणावामुळं
कवटीचं कवच लाभलेला
मेंदूही जातो फुगून
नि कण्हू लागतो ओढाताणीनं.
"डोकेदुखी" म्हणतात याला लोक -
नि "संसार" म्हणतात संत !
- एक अस्वस्थ जीवन;
असह्य भोग ज्यांचा शेवट होत नाही -
- भोगणाऱ्याचा शेवट होईपर्यंत
यातून पार पडून
जो जातो पलीकडे
तो होतो त्यापासून मुक्त.
"साध्य होतं हे ध्यानानं"
सांगून ठेवलय जाणकारानी.
मी घेतलं ध्यानी नि अनुसरलं.

नव्यानी घेतली जुन्या विचारांची जागा
नि सैल झाला थोडा तणावाचा धागा.
निद्रादेवीनं केली कृपा
नि गेलं सारं विस्मृतीत !

सुरु झाला अखंड प्रवास,
खूप खोल अंतहीन अंधारात !

"अहं" पडतो गळून;
काळ जातो थिजून;
मरणरहित विश्राम,
अचेतन जगण्याचं सुरु होतं काम !
एक अद्वितीय अस्तित्व -
- जिथं क्रियाशील रहात नाहीत ज्ञानेंद्रियं -
- जिथं आत्मा, देतो भिरकावून,
"अहं" नं घेरलेल्या मुखवट्याना
नि विहरत असतो
स्वत:च्या अस्तित्वाच्या
अनंत महासागरात !
अशा अनाद्यंतात जाण्याचं
प्रवेशद्वारच की काय, ही स्थिती म्हणजे ?

मी जागा झालो
नि अनुभूती होऊ लागलो;
सारं कसं शांत शांत-
अंतर्मनात नि बाह्यजगातही !"

## ६१. ब्रह्म

"ब्रम्ह !"
महान ! अमर्याद !
म्हणजे नेमका काय, त्याचा खाक्या ?
कशी करायची त्याची व्याख्या ?

सांगायला जायचं म्हणजे शब्दांत अडकायचं !
कल्पनाच करायची काहीं बाही
तर त्याला सीमाच नाही.

डोळ्यानी होणारं अवलोकन
कानानी होणारं ध्वनीग्रहण
हातांची धारण शक्ती
मनाची चिंतनशीलता -
इंद्रियांच्या ह्या -
- गुणविशेषाना वगळलं
की मागं राहील ते ''ब्रह्म'' !
या अदृश्याचेही ज्ञाते आहेत !
या अव्यक्ताचं गुणगान करणारेही आहेतच !
आहे ना, एक अद्‌भूत रहस्य ?

सिध्दपुरुष खोटारडे वाटतात !
ते खोटं बोलतात
असं वाटतं खरं;
पण खरं सांगायचं तर
निश्चितच ते
खोटं नसतं बरं !
हे ''समस्त'' ब्रह्मच आहे -
अशी त्यांची धारणा !
''पण हे ''समस्त'' म्हणजे काय
नि असतं कुठं ?

या प्रश्नाला ते फक्त हसतात
नि मौन होतात, अगदी पुरते मौन !
नि पुढे चालले जातात !

□ □

# ६२. साक्षीभूत

सुखदु:खांच्या फरफटीतून
करुन घ्यायची असेल स्वत:ची सुटका
तर निर्विकार दृष्टीनं, निर्विचार मनानं
तिऱ्हाईताप्रमाणं पहायचं जगाकडं
केवळ एक साक्षीभूत राहून !

सुखद तरंग लहरींनी भरलेल्या
एखाद्या विशाल सागरात,
अविश्रांत विहरणारे मासे,
उत्साहानं इतस्तत: टुणटुणणारे बेडूक,
डुबकी घेणारे वन्य प्राणी,
चिमण्या पक्ष्यांचा गोड किलबिलाट,
उगवत्या रवीच्या सुवर्ण किरणानी -
न्हाऊन निघालेलं हिरवं आसमंत;
निसर्ग बाळ जागं झालेलं,
अशा नयनरम्य वातावरणात
नितांत मौन धारण करीत,
आपल्या डौलदार शैलीत
ताठ मान ठेवून
केवळ एक साक्षीभूत राहून
संथपणे विहरणारा पांढरा शुभ्र राजहंस !
डोळ्याचं पारणं फेडणारं
एक नितांत सुंदर दृश्य !

सिध्दसंतही विहरत असतात -
संथपणं - राजहंसाप्रमाणं -

दृश्य विषयांच्या महासागरावरतून -
- केवळ एक साक्षीभूत राहून !

जन्म असो की मृत्यू,
हंसू असो की आंसू,
धोक्याच लाल असो -
की सुरक्षिततेचा हिरवा कंदिल,
सिध्दपुरुष राहतो अविचल;
दृष्टीक्षेप करत असतो स्थितप्रज्ञाप्रमाणं.

पांढरी दाढी - डोक्यावर करडे केस धारण केलेला
वयोवृध्द ज्ञानवृध्द सिध्दपुरुष,
बसलेला असतो निरखत निरंतर -
निर्विचार निर्विकार
जसा -
मानवी गलक्यापासून दूर
उंच आकाशात भिडलेला
हिमाच्छादित हिमालय
अविचलित उभा ठाकलाय
तळावरच्या जमीन सपाटीवर
साक्षीभूत होऊन, दृष्टीक्षेप टाकीत -
- जिथं माणूस संसार थाटत आलाय -
नि उध्वस्तही करीत आलाय !
निर्व्याज प्रेम करीत आलाय -
नि फसवणूकही करत आलाय !
इथंच आहे पवित्र गंगेच्या प्रवाहाचा थाट;
नि इथंच नेहमी वाहतात रक्ताचे पाट !

ज्ञानी संत मात्र, लांबवर,
ढगाच्या उंचीवर

एकांड्या ढगाप्रमाणे
निवांत बसत असतो सतर्क राहून -
- ऐहिक जगाच्या कटकटीपासून
विकार व विचारापासून दूर;
कुणाच्याही हाती न लागण्याइतपत दूर !

जणू पोकळी भरल्या आकाशात
वसणारा सतर्क रजनीकांतच !

❑ ❑

## ६३. नामजप

प्रभात काय होते !
गुलाबी रंगछटेनं नटलेला
दिव्य चेहरा धारण केलेली
रमणीच पूर्वेला प्रकट होते !
उत्कट प्रसन्नतेचा सुगंध
दरवळीत आसमंतात
प्रति दिनी होणारं तिचं सुखागमन
बनून राहिलीय पूर्वेची अपूर्व घटनाच !

एका पावन संताच्या सान्निध्यात
बसतात लोक रोज असंख्यात ॥
न्हाऊन निघतात नखशिखांत
पहाटेच्या शीतल वातावरणात ॥
बसतात सगळे ओळीनं -
प्रभूमहिमेचा उत्सव साजरा करण्यासाठी
नसानसातून भक्ती अंमळ

अंतर्बाह्य दिसतात निर्मळ
उत्पत्ती कार्याचा ओघ
अविरत चालू ठेवणाऱ्या ईश्वराचा
तासभर करतात नामजप ।।
निनाद सामुहिक जपाचा
घुमून जातो दसदिशांत;
जाऊन भिडतो सगळ्यांच्या हृदयात ।।
गळून पडतात पापांची किल्मिषं
भरुन जातात मनं, निरागसतेनं ।।
जातात निघून कायमच्या
काळज्या, दुःख, कटकटी
बांधून आपल्या वळकटी !!

 

## ६४. देवाला वाहिलेलं भक्तीचं सुवर्णपुष्प

एका भक्तानं, आपल्या अनन्य भक्तीला
रुप दिलं सुवर्णपुष्पाचं
नि केलं अर्पण -
एका महान् गुरुच्या, पवित्र चरणी ।।
ही घटना पाहिली, हजारो लोकांनी
कौतुकानं भक्तीभावानं, भरल्या डोळ्यांनी.
त्या लखलखणाऱ्या -
मौल्यवान सुवर्णपुष्पाच्या माध्यमानं,
त्याच्या निर्मल भावना -
निर्झर जलाच्या कारंजासारख्या -
प्रभावित होऊन, होत होत्या प्रवाहित,

- त्याच्या हृदयापासून
गुरुवर्याच्या हृदयकमलापर्यंत ।।

गुरु उद्गारला -
"हे टंच सुवर्णनाणं
झालंय धन्य ईश्वरी कृपाप्रसादानं;
उचित ठरेल त्याच्या योग्यते प्रमाणं
योग्य स्थानावर आता स्थानापन्न होणं ।।
या उदात्त विचारानं
दिलं गेलं एका
पुर्नभेटीच्या रुपानं;
नि धन्य झालं गौरव - वर्षावानं ।।

उधळली गेली त्या गुरुवर्यावर
त्याच्या उदार देणगीच्या "सत्कृत्यावर" !
भारदस्त शब्दांची स्तुती सुमनं
पुष्पातलं सुवर्ण मात्र,
हसलं गालातल्या गालात;
आहे असा कुणी
जो ठेवू शकेल मला बंधनात ?
ते सहज विचारतं झालं !

 

## ६५. जीवन कळी खुलते अन्नाच्या अनुग्रहानं

जीवन असतं अन्नावर अवलंबून
जसा चंद्र सूर्यप्रकाशावर विसंबून ।
एखादं फळ किंवा भाकरी

दिसायला वाटते नगण्य;
जीवन शक्तीच्या स्रोतात
नि:संशय अग्रगण्य ॥
विचाराना नि भावनाना -
चालना देणारी सुप्तशक्ती आहे हे अन्न !
तत्वशास्त्राचा व काव्योत्पतीचा
स्रोत आहे धान्याच्या कणांत
नि पाण्याच्या थेंबांत !

उफाळून येणारे शब्दोच्चार,
चेहऱ्यावर खुलणारा सौंदर्य भाव,
हा सगळा अन्नाचा प्रभाव !
शांती वा मत्सर
याचं मूळ दडलंय खोल
धान्यांच्या राशीत
नि पाण्याच्या साठयात ॥
त्वचेची कोमलता, डोळ्यातली चमक
मेंदुची तीक्ष्णता, नसांची धमक,
ही सारी किमया-
काही पाण्याच्या घोटांची
नि अन्नाच्या घासांची !!

उदंड उत्साह नि कलाकुसरीतलं कसब,
म्हणजे भाकरीच्या तुकड्यांतून-
विसर्जित होणारी ऊर्जाच अजब !

जोवर तुमचं ताट असतं अन्नानं भरलेलं !
तोवर तुमचं जीवन असतं जोमानं फुललेलं !!

## ६६. ''मीच की काय ती''?

मी कोण-एक यक्ष प्रश्न ।
मी म्हणजे हा मेज की हे पुस्तक ?
छे! काही तरीच,-मुर्खपणा
मग मी हे शरीर की हा श्वास ?
या पैकी काहीच नाही हमखास !
शरीर आहे एक यंत्र
श्वास ह्या यंत्राची सुप्तशक्ती;
हे दोन्ही आहेत-
दारू भरलेल्या बाटली प्रमाणे !
बाटलीला नसतं माहीत
कि तिच्यात असते दारू;
दारूला नसत माहीत
कि तिच्यात असते ताकत
नशा चढण्याची
व तो अनुभविण्याची.
नशेच्या परिणामाची जाण असलेला
दारूच्या जाळ्यात नाही अडकत,
मग प्रत्यक्ष नशेची मजा चाखणारा
असा असतो तरी कोण ?
नशेत चुर होणारा
कुणी एखादाही वेडा नसावा
हा विचारच निव्वळ वेडगळपणाचा नक्कीच !
प्रचिती असलेला तो म्हणजे
परमोच्य जागरुकतेचा अवतारच
गफलतीच्या अंधाऱ्या लहरीचा
लवलेशही सापडणे दुरापास्त,

सजगतेला नसतो कसल्याही मर्यादेचा मापदंड
ती असते अंतरहित
पण असते निश्चितच अस्तित्वात !
सदैव बंधमुक्त असल्यामुळे
असते काळातीत.
ब्रम्ह म्हणा हवंतर तिला !
मीच असेन का
या सजगतेच्या रूपात ?

❑ ❑

## ६७. जुगारी

ही वसुंधरा बनलीय
जुगाऱ्यांचा आवडता अड्डा !
जुगारी मानवानं मनोमन मानलयं
नशीबालाच आपला सार्वभौम राजा ।।
दैवाचाच राजदंड या राजाच्या हाती,
दैवाचेच कायदे,
त्याच्या कारभाराचे साथी ।
प्रजेच्या नात्यानं माणसाला
या राजाचा भारी अभिमान !
मोठ्या स्नेहानं करतो याचं मानपान !!

लाखोच्या संख्येनं बसतात लोक-
नशीबाच्या मेजाभोवती;
आयुष्यातल्या दोन अमुल्य वस्तु
-जीव अन् बुद्धीमत्ता

ह्या सुध्दा लावतो पणाला माणूस,
मोठ्या उत्कंठेनं नि जोखीम पत्करुन !
प्रत्येक क्षणी तो हरतो;
प्रत्येक मिनिटाला
हाती असलेलं गमावत बसतो !
हरण्यातही तो
स्वर्गाय सुखाच्या लज्जतीचा
मनमुराद आनंद लुटतो ॥
ही चटच चालू ठेवते, नशीबाचा खेळ;
पैजा लावण्याचा लावते नाद,
वर्षानुवर्ष जोखीम पत्करुन
वृध्दावस्थेत ठेवते माणसाला आणून
नि देते साथ सोडून !
ताकत हटलेली, अवसान गळालेलं;
मन नि इंद्रिय झालेली दुबळी,
अकलेचं झालेलं खोबरं-
अशाअवस्थेत मृत्यूशय्येवर पडलेला,
तरी सुध्दा जुन्या डावांच्या स्वप्नात
माणुस असतो रंगलेला !
त्याच्या जुगारी वृत्तीचा उत्साह
किंचितही नसतो हटलेला !
सरते शेवटी...
पुनश्च जीवन जगण्याकरिता
नि पुनश्च हरत बसण्याकरिता
जुगाऱ्याच्या टेबलावर
परतण्याच्या विचारातच
इहलोकींची यात्रा
संपवितो माणूस !!

पूर्वेकडचा एक ज्ञानी संत
दूर अंतरावर अलिप्त पणें एकटाच उभा ठाकलेला !
संपादलेलं सर्व गमावून बसण्याच्या-
- या खेळाला साक्षीभूत राहून
बुध्दीवंत संत सहज हसतो;
त्या गोड हंसण्यात होतं,
सत्याचं दर्शन !
दरवळतो स्नेहाचा सुगंध.
प्रारब्धाला दिसतो स्वतःचा गुरू,
त्या संताच्या रुपात !

## ६८. संगीत

अप्सरांच्या चपळाईनं
त्याची बोटं फिरु लागली तंतुवाद्यावर;
निश्चल हवा तत्पर झाली,
नि नाचू लागली थुई थुई-
तंतुच्या सूरांशी सूर जुळवीत.

घुमू लागल्या दसदिशांत
मधुरातिमधुर स्वरांच्या लहरीवर लहरी
ज्यांच्या ज्ञानेद्रियांची जणु एकवटलीय श्रवणेंद्रियांत शक्ती
-असे शेकड्यानी उपस्थित लोक
कानांच्या पंखावर होऊन स्वार,
सुश्राव्य स्वरांच्या सागरात
करु लागलेत आनंदविहार !

तन्मयतेनं बाजी मारलीय
डोळ्याना तंद्री लागलीय;
छायेच्या रूपात डोलू लागलीय काया;
मनाचं हरपलय भान;
ऐकणाऱ्यांची समाधी लागलीय
नि ''ऐकणं'' ही एकच क्रिया
तिथं बनून राहिलीय !

एक आगळा वेगळा दिव्य अनुभव !
त्याच्या मनावर मोहिनी घातलीय-
एका जगावेगळ्या अनुभूतीनं.

तो झालाय इतका तद्रूप
की ऐकण्याच्या
मनस्थितीतच नाहीये तो !

❑ ❑

## ६९. हिंदुत्व

हिंदुत्व म्हणजे......
जगण्याची एक पद्धत की चालरीत ?
नव्हे !
त्याचं रुप आहे विशाल सुपीक धरतीचं
जिथं फुललेत बागबगीचे, -टोले जंगवृक्षानी भरलेले,
मनमोहक लतानी वेढलेले,
सुकोमल फुलांनी युक्त,
मनाला दिलासा देणारे ॥
घेतला यांत प्रवेश,

तर उचंबळून जाईल नि थक्क होईल मन,
परमोच्च शांती व स्वस्थतेच्या-
दिव्य सुगंधाच्या अनुभूतीनं-
नि पवित्र प्रेम अन् सात्विक भाव,
यांच्या दिव्यामृत पानानं ॥
गहन नक्षत्रमंडळातले
चंद्र नि तारे शोभणाऱ्या
थोर ज्ञानी सिध्द संत महात्म्यांच्या
निजसान्निध्याचा लाभ घेतला तर
अंतर्मनात ऐकू येतात
अध्यात्मिक संगीताचे दिव्य स्वर !

नि मग मन पुरत हरवून जातं
वास्तव हिंदुत्वाच्या
शाश्वत स्वरूपात !

□ □

## ७०. जीवाच्या शोधात

जीव !
विशिष्ट हेतुनं होणारी हालचाल !
मूलतत्व विषयक वासस्थान !
खास करुन अंत:प्रेरित-
व केव्हा केव्हा उपजत-
अशा प्रवृत्तीचं !

जीवाच्या शोधात
खोल गर्तेत, शरीरात
त्वचा, मांस नि हाडं
यांच्याही पलीकडे पोहोचल्यावर

दिसतील वासनांचे मोहोळ,
प्रतिमांचे पोळ
विचारांचं कोळीष्टक !
यातून करताना भ्रमण-
येईल सामोरा-
प्रकाशरहित प्रदेश
अवकाशरहित गुहा-
जिथं घडत असतात,काळातीत घटना;
ऐकू येत जीवाचं स्पंदन,
ताऱ्यांच्या अंतरावरून सुध्दा !

स्पंदनाचा वेध घेत-
मोठ्या आशेनं, केली हिम्मत-
आणखी खोल जाण्याची,
तर वितळून जाईल हिमाप्रमाणं-
नि होऊन जाईल दृष्टीआड
तो "शोधक" (नि त्याचा शोध) !

## ७१. पवित्र हिंदुधर्म

हिंदु धर्म !
खूप पुरातन ?
अथवा असावा अनादी-
एखाद्या नदीसारखा-
अज्ञातातून मार्गक्रमण करीत आलेला एकसारखा !
चालूच राहील पुढंही
अखंड त्याचं वाहणं !

"ग्रंथ-पुराण" एवढंच नाही त्याच संदिग्ध रंगरूप
नाही एखादी वस्तु
कि खंडीभर शब्दानी
वर्णिता येईल तिचं निज स्वरूप.
हिंदुत्व आहे ज्ञानसंपदा !
प्रगल्भ बुध्दीमत्तेच्या, उत्तुंग शिखरावरून
अखंड बरसणारी महान पावन ज्ञानसंपदा !!
इतकंच नव्हे !

हिंदुत्व म्हणजे,
महान ज्ञानीयांच्या-
परमहंस संत महात्म्यांच्या-
दिव्य ज्ञानरूपी श्वासनलिकातून-
क्रियान्वित होणारे दिव्य दीर्घ श्वासच !
दिव्य स्वर आळविणाऱ्या
पवित्र मंगल शहनायाच या !
"मंत्र" म्हणा हवंतर त्यानां !!

मानवानं जपून ठेवलेला
सत्यांशाचा अमुल्य ठेवा !
असा हा पवित्र हिंदुधर्म !!

□

## ७२. ऋषि-मुनी

दिव्य प्रभात नि दैदिप्यमान सुर्यप्रकाश
लाभलेल्या या पुण्यभूमीवर
सहस्रावधी वर्षापूर्वी

बसत होते महान् ऋषिवर,
ज्ञानीयातले ज्ञानी श्रेष्ठवर ॥

अंबाड्याची वस्त्रं परिधान केलेले-
जरी होते ते फलाहारी-
त्यांच्या डोळ्यांतली चमक मात्र
सुर्यालाही लाजविणारी !
त्याचं मन कसं अगदी शांत;
जणूं निवांत रजनीकांत !

मनाच्या केल्या त्यानी वाटिका;
त्यात भरल्या जीवनाच्या अमर गुटिका !

जणू कमलपुष्पांचंच बनलेलं त्याचं हृदय,
आवर्जून परावर्तित करीत असे-
आंतरिक स्नेहाचा सुगंध चहुंकडं;
पवित्र नद्यांच्या या धरतीवर
दिव्य कांतीमय देवांच्या स्वरूपात
निवांत संचार करीत असत ते चहूंकडं !

कष्ट, नैराश्य, दुःख, विपत्ती,
यांची कधी वाटलीच नाही त्याना आपत्ती.
ते बोलत तेच मुळी मंगल गीतातून !
नकळत फुलत असे काव्य-
त्यांच्या अंतर्मनातून !

अणु-रेणू ते अखिल चराचर
ही देवानं निर्मिलेली सौंदर्य सृष्टी
असं बघण्याची त्यांची दृष्टी !

मंद हास्य हाच त्यांचा परिवेष
पवित्र अन् महान् ।
आनंदी वृत्ती हीच त्यांची धनदैलत,
गडगंज नि मौल्यवान !!

## ७३. काळाची धाव

जसा अंत नाही अंतराळाला,
तो सदोदित दिसतो पसरलेला !
तशी उसंत नाही काळाला,
सदैव दिसतो पळत असलेला !!

कितीही घेतला काळाचा शोध,
तरी ज्ञानेंद्रियानां नाही होतं त्याचा बोध !
असं जरी असलं तरी-----
काळाची जाणीव होते खरी-
-एखादा सुरकुतलेला चेहरा पाहून-
एखादा कोमेजलेला गुलाब बघून.

अदृश्य हा काळरूपी वारा
उठून दिसतो सूर्य, चंद्र नि ताऱ्यांत.
गहन याचा प्रवाह
चिरडून धुळीला मिळवितो लाखो जीव
तसा ओतूनही देतो कोट्यावधीत प्राण !

चिर तारूण्यात असलेला हा म्हातारा
महान्ज्ञानी मुकुटमणीच्या सकट

साऱ्या मानव वसाहतींना
नि बेसुमार होणाऱ्या वाढीला
लोटून काढतो अव्याहत
एकजात झाडून सपाटून-
-भुईसपाट करून !

कुणास ठाऊकाय
याची कचरापेटी
आहे कुठं ती ?
चुकून जर का लागला थांगपत्ता-
तर त्याच क्षणी...
गोठून जाईल क्षणांच्या प्रवाहाचा ओघ-
नि मागं राहील
कल्पनातीत अगणित दिव्य असा
कालातीत काळ !!

□ □

## ७४. असा हा जीव

परिवर्तन शीलतेच्या वाऱ्याच्या तडाख्यात
जीवज्योती सारखी धुगधुगते.

निरंतरतेच्या अंध:कारात
कुण्या अदृष्टाच्या हातून
गूढपणे प्रज्वलित केली गेलेली
ही जीवज्योती
पृथ्वीरूपी मृण्मय रक्षापात्रात
जळ जळ जळतेय !

या जीव-ज्योतीच्या आहेत पाच संवेदना;
मेंदूशी जोडले गेलेत त्यांचे अँटेना !
शब्द, स्पर्श, रस, रुप, गंध
या आहेत त्या पांच.
जीव ज्योतीच्या अंवती भंवती,
सतत असते त्यांची वसती.
नि तिच्या मध्यात
दृढपणं धगधगतोय तो "अहं"!
-ज्योतीच्या प्रकाशाचा गाढ गाभाच जणूं !

सुखदुःखाच्या कचाट्यात
पुरता गुरफटला गेलेला,
बाह्यजगाला अदृश्य
हा "अहं"रुपी कोळी,
विलक्षण जाळे विणतो मोहाचे
व दिङ्मूढ करणाऱ्या स्वप्नांचे !
भुरळ पडलेला हा प्राणी
हताशपणं चांचपडतो;
नि धडपडतो बाहेर पडण्यासाठी
स्वतःच विणलेल्या जाळ्यातून !

## ७९. सुख

सुख मानाव लागतं
दुःख भोगाव लागतं !
पण मानायलाच तयार नाही कुणी,
हे कटुसत्य !

सारं जग धडपडतय सुख प्राप्ती करिता;
परमसुखाच्या लाटा उद्‌भवतात
संतोषाच्या सागरातून !
माणूस बाळगून असतो मनात स्वप्न -
- आपल्या नाडीच्या अंतिम ठोक्यापर्यंत
की, असा एक निवारा असावा
जिथं दुःखाचं नांव नसावं
सुख ओसंडून वहात असावं !
तो मनात बाळगतो कामना
इच्छा आकांक्षांच्या पूर्तीची
नात्यागोत्यांच्या सुखाची.

साखरे सारख्या गोड पाण्याच्या शोधात,
प्रसंगी उष्णाति उष्ण वाळवंट खणून काढतो
नि त्यातच खोल रुतून बसतो !
तो खेळ तमाशा करतो
नृत्य संगीताच्या मैफली भरवितो
बाहुल्यांना नाच नाच नाचवितो
सुंदर रमणींत रमून जातो !!
पेये नि मद्यासारखी उत्तेजके घेतो
मोजमाप करतो
प्राण्यांची चिरफाड करतो.
सुक्ष्मदर्शकाच्या माध्यमातून
संशोधन कार्य करतो.
अणू विभागून स्फोट घडवितो
अनंत आकाशाचा वेध घेतो
नि देवाची तोंडभरुन स्तुतीही करतो !
बिचाऱ्याच नशीब !

इतक्या हावरेपणानं मिळविलेल्या वस्तुतून
त्याच्या हाती येतं फक्त दुःखच !
सुखाची आशा मात्र अमर !
समोरील आमिष हांसील करण्यापायी
त्याच्या घोड्याची दौड चालूच असते
त्याचा ससाही,
दोन शिंगांची आशा बाळगून आहे
मृगजळावर दृष्टी टिकवून
भरधाव वेगानं धावतोय त्याचा मृग !!

प्रत्येक नवीन जोडपं,
सुखद विवाहाची ग्वाही देतं;
नववर्षांच सुखानंदात केलं जातं स्वागत;
लाखोंच्या संख्येनं
केली जाते मंगल प्रार्थना नि पुजाअर्चा;
घातले जातात आनंदानं साष्टांग दंडवत !
नवजन्माच्या नि वाढदिवसाच्या शुभकामना
मेजवान्यांचा आनंद, सणांचा जष्ढोष,
होलिकोत्सवाची शोभा,
शुभाशिर्वादांचा, अनुग्रहांचा सुखद वर्षाव
सर्वकाही सुखद ! आनंदी आनंद !!

सुख गालातल्या गालात
हसत असतं आडून.

सुखाला असते शेवाळाची घसरण;
पडलं रे पडलं एक पाऊल त्याच्यावर
तर होते माणसाची गत
नरकात पडल्यागत !!

 

## ७६. सेवा

सेवा ओळखली जाते
संसार व मोक्ष
याना जोडणाऱ्या पुलाच्या रुपात.
सेवेच्या स्तुतीपर नि नेकीनं भरलेला धर्म''
''खऱ्या अर्थानं ईश्वरी पुजा हे सेवाकर्म''
''सेवा म्हणजे साक्षात् स्वर्ग-सुखाचं मर्म.

प्रत्येक व्यासपीठावरुन
ते गुणगान करतात, सेवेच्या उत्कटतेच.
तिच्या दिव्यत्वाच्या वाखाणणीत,
प्रवचने झोडतात तासन् तास
ऐकणारे ऐकतात तासन् तास !

पण खरोखरीच
आहे का कुठ प्रत्यक्षात,
''सेवा'' नावाची गोष्ट ?
विशेष आनंद लाभाच्या अभिलाषेनं
दुसऱ्याला कोणत्या ना कोणत्या स्वरुपात
थोड्या फार मदतीचा हात देण्यास
बाध्य होण्याच्या कृतीला
''सदुपकाराचं कृत्य'' अस येईल काय संबोधता ?

मातेचं मुलाला स्तनपान करणं,
''आहेरे'' नी नाहीरे ना केलेलं मदतरुपी दान
चालणाऱ्यानं पडलेल्याला दिलेलं उत्थान -
वाहत्या नदीनं वाटेतील झाडाना
करविलेलं जलपान
ही सहज कृत्यंच ना !

सूर्य प्रकाश देतो
दिवा अंधार घालवितो
चंद्र शीतलता प्रदान करतो
फुलांमुळं सुगंध दरवळतो
नि लाखोना त्याचा लाभ घडतो
पण म्हणता येईल काय
या कृती सेवेच्या म्हणून ?
आहे काय पर्याय त्याना त्या केल्याविना ?

माणसानं सदासर्वदा प्रफुल्लित रहावं;
त्याच्या चांगुलपणाच्या शीतल छायेखाली
किती सुखावतात शेजारी पाजारी
ते अनुभवावं;
हंसाची चाल, जात्याच ऐटीची!
दिलखुलास सौंदर्यमाधुर्याच्या -
चमत्कृतीजन्य विश्वात -
चूर होऊन जाण्याची,
स्वभावत:च असते वृत्ती कवीश्रेष्ठांची
एखाद्या संताप्रमाणं -
हिमालयाचं शिखर -
शोभत असतं हिमाच्या शुभ्रतेनं ।
उत्कटतेच्या महासागरात हरवून जाण्याचा
जन्मजात गुण असतो -
संतांचा, साधकांचा, पक्ष्यांचा !
भुकेल्याला घास भरविण्याचं भाग्य
जर झालं प्राप्त एखाद्याला,
तर लागतो तो आनंद सागरात पोहायला
नि अद्वितीय सुख-स्नानाची अनुभूती घ्यायला !

जे घडतं ते स्वभावधर्म म्हणून !
ज्याचं त्याचं सहज कर्तव्य कर्म म्हणून !!
आंतरिक आनंदाची उर्मी म्हणून !!!

मग कुणाच्या हातून
कुणाची घडते सेवा
सांगू शकेल कुणी ?

 

## ७७. थंडी

प्रत्यक्षात अदृश्य ही थंडी
स्नायुनां अशी बोचते
नि हाडानां अशी हादरविते
कि देहभानाचा स्वामी "अहं"
यालाही तिच्या कडाक्याची चुणुक जाणवते.

उबदार किरणे पसरवत
प्रसन्न मंद हास्य मुद्रेनं
उगवलेला सूर्य म्हणजे
बोचऱ्या थंडीच्या वेळचा
सुखाचा स्वर्गच !
कोवळी उन्हं खाणं म्हणजे
नवचैतन्याचा सुखद संसार अनुभविणं
घोंगडी अन् मऊ मऊ उशीनं
खोळ नि उबदार रजईनं
.. युक्त अशा शानदार शय्येची

गुलाबी थंडीत लाभलेली सोबत
म्हणजे कोवळ्या गोजिऱ्या अर्भकाला
लाभलेला मातेच्या मांडीचा आसरा !

तशात साखरझोपेनं, जर केली कृपा
तर विरुन जाते ज्ञानेंद्रियांची दुनिया
नि फुलून येते स्वप्नांची बाग !
झोपेतच चुळबुळतो तो
अमृतानं न्हाऊन निघालेले
पंख फुटतात त्याला
नि नेऊन अलगत ठेवतात-
त्याला देवलोकात !

 

## ७८. ग्रंथ

ग्रंथांचा ढीग पडलाय माझ्या मेजावर.
एकदा का सुखात केली चाळायला,
की वेळेच नाही रहात भान् मला !
सरकु लागतात अनेक गोष्टी
आपलं सौंदर्य खुलवून
एका मागून एक डोळ्यासमोरुन;
दृष्टी समोर निर्माण होते एक सृष्टी छानशी
सर्व किल्मिषांपासून मुक्त-
स्वच्छ नि निर्मल अशी !
दिव्य मनमोहक फुलांचा
मनी भावणारा सुगंध,

मधाळ चवीचे विविध मिष्टान्न,
चट लावून वश करतात ज्ञानेंद्रियाना !
स्वर्गीय संगीताच्या स्वरलहरींनी
आत्म्याची लागते ब्रम्हानंदी टाळी !!
अशीच होते गत
ग्रंथांच्या निज सहवासाच्या वेळी.

असे आहेत हे ग्रंथराज
तीक्ष्ण बोधशक्ती युक्त कविराज.
शास्त्रज्ञाशी घडतं सानिध्य,
संतांचा लाभतो सहवास
या ग्रंथांच्या रुपात !
फुंकर घालून नेऊन ठेवतात नकळत आपल्याला
अमर्याद अस्तित्वाच्या जगतात !!
मग आपण तरत जात, परमाणू लोकात
पुढं जाऊन पोंचतो,
निरंतर पसरलेल्या अनंत अवकाशात !!

तिथं आपलं अस्तित्व आपणच जातो विसरुन
नि बसतो स्वतःला पुरतं हरवून !!

## ७९. नववर्षाचं आगमन नि माणूस एक वर्षानं अधिक म्हातारा

हळुवार पावलानं हर्षोत्साहानं,
नववर्षाचं होतं आगमन,
नि माणसाच्या वयात -

- डोक्यावरच्या चंदेरी केसात,
- चेहऱ्यावरील सुरकुत्यात,
एकाची पडते भर !
पृथ्वीवरच स्वर्ग निर्माण करण्याच्या हव्यासानं
हवन करतो माणूस
नद्या भरुन तेलाचे;
स्फोट घडवितो
टनावारी स्फोटकांचे !
वेठीस धरतो माणूस
वारा किरण नि लाटाना,
पण परिणामी काही येत नाही
असं काही करतानां,
थखलं भागलं शरीर,
फाटकी अंगवस्त्रं,
गळक्या छताचा आसरा,
अशी त्याची अंतिम अवस्था !

त्याच्या स्वयंपाकाची जागा रिकामी !
त्याची गात्रं झालेली निकामी !!




## ८०. जीवन-एक जत्रा

मानवी जीवन आहे एक जत्रा,
आशा आकांक्षांचे असंख्य विचार -
दाटीवाटीनं भरलेली !!

जणूं सहलीहून परतलेल्या मुलाचा
गारगोट्यांनी भरलेला अंगरख्याचा खिसा !
जणूं जुलमी राजाच्या राज्यातली
कैद्यानी खचाखच भरलेली अंधार कोठडी !
जणूं एक जुना पुराणा महाल,
ढिगाऱ्याच्या अवस्थेतला !

मनाची होत असते सतत घालमेल
जीवनयात्रेत घडणाऱ्या –
प्रचंड घडामोडीनं,
चालू असतो भावनांचा
उद्भव निलय अविरत
ईच्छा आकांक्षा तीव्र बनतात;
क्रमणे क्षीण होत लोप पावतात.
सुखदुःख आशा-निराशाचं चक्र,
होत असतं वर खाली
जत्रेतल्या पाळणा चक्राप्रमाणं !
जत्रेच्या गर्दीत शिरलं
कि वाट चुकायची नक्की ठरलेलं !
नाना प्रलोभनानी
मन होतं दोलायमान !
जीवनयात्रा संपते एकदाची !
पण संपण्यापूर्वी
मागे सोडून जातो माणूस
त्याचा तो दृढ "अहं" !

◻ ◻

# ८१. प्रक्रिया अंतर्मनात डोकाविण्याची

जडवस्तु !
म्हणजे काय असावं हिचं नक्की स्वरुप ?
तीक्ष्णातितीक्ष्ण नजरेनं,
खोलवर डोकावून पाहिलं,
तर डोळ्याना दिसतील,
वितळून जात असलेले धुक्यांचे ढग !

एखाद्या वस्तुवर किंवा फुलावर,
खिळविली नजर अगदी जवळून,
तर त्याचं सौंदर्यही
भासेल पुसट नि अंधूक !
गोड गोड शब्द
साखरेत घोळलेले,
मधाच्या रुचीनं भरलेले,
कानाना करतात मंत्र मुग्ध !
भावनांचा कारंजा शोभणाऱ्या हृदयात,
अगदी जवळून, आत डोकावून -
पहाण्याचा केला प्रयत्न,
तर जाणवेल,
शब्द तथ्यहीन नि निस्तेज बनल्याच -
घुटमळत असल्याची जाणवेल
नीरव स्तब्धता,
एखाद्या गुहेतल्यासारखी
यास्तव.....
नेहमीच सुंदर दिसावं हे जग,
असं वाटत असेल मनापासून,
तर पडू नये माणसानं,
डोकावण्याच्या नसत्या भानगडीत !





## ८२. अनंत देखावा

ज्या स्थितीत
मनाचं अस्तित्व
मनालाच जाणवत नाही,
जीव निश्चल नि अचेतन वाटतो
"समाधी स्थिती" म्हणतात तिला.

कसली तरी अज्ञात वेगशक्ती
मला दूर कुठतरी दूर
घेऊन जात असल्यासारखं वाटतं -
या भौतिक जगापासून !
अणू एवढी भासू लागते पृथ्वी.
अंतर्दुष्टी समोरचा काळोखाचा ठिपका,
विसावतो शून्यात विलीन होऊन.

सूर्य, तारे प्रवेशतात अंधार कोठडीत;
जडवस्तु विलीन होते चैतन्यात.
मन जातं पुरतं उडून
मागं शून्य ठेवून !

अंतराळ सामावतं अवकाशरहित अनंतात !
काळ जातो वाहत, शाश्वत पाताळात !!
नसते गणना कशाची,
नसतो कशाचा शेवट !
न दिसतो कुठे
जन्म-मृत्युचा फेरा
प्रकाश सामावतो काळोखात;
नि मग लुकलुकत राहतो कांतीहीन.
तिथे माझा लोप होतो;
मी स्थित होतो निरंतर शाश्वतात !!

□ □

## ८३. "कडाक्याच्या थंडीत हुंदडणारं गाढव"

पूर्वान्हीच्या निरभ्र
नि अंधुक निळ्या आकाशांत
एरवी तळपणाऱ्या सूर्यालाही
भरलीय हुडहुडी, कडाक्याच्या थंडीमुळं.
त्याचे किरण भासतायेत निस्तेज;
नि गोठून जातात वाटेतच,
पृथ्वीरुपी स्वगृही पोचण्या आधीच !

सूंसू करीत घोंगावतोय वारा;
पिवळ्या पानांचा पाचोळा साठवत,
हिवाळा संपण्याच्या प्रतीक्षेत
बसलेत झाडांचे सांगाडे विसावत !

भडकलेल्या भावना
नि निखाऱ्याप्रमाणं
बाहेर पडणारे जळजळीत शब्द
यांचीही धार होते बोथट
या थंडीच्या कडाक्यात !

पाठीवरच्या नि मनावरच्या
साऱ्या बोजापासून पूर्णपणं मुक्त
असे एक गर्दभराज
फिरतायेत इतस्तत: आरामात चरत.
साऱ्या जगालाच आपल्या कह्यात
या थंडीनं दिलय ठेवून !
हे गाढव मात्र उरलंय तिला पुरुन !!
कुणी नाही त्याचा माग काढणारा;
कुणीच नाही त्याच्यावर स्वार होणारा;
नाही कुणी त्याच्यावर ओझं लादणारा !
मोकाट फिरतंय ते रुबाबात

एखाद्या स्वयंघोषित राजकुमाराप्रमाणं,
मनोमन देवाला प्रार्थना करीत-
"कृपानिधी देवाधिदेवा,
हा हिवाळा जशाचा तसाच की हो ठेवा !
म्हणजे ते तुमचे मानवी सैतान,
पडून राहतील घरात,
ऊब घेत बिछान्यात !
इकडं मी स्वार होईन थंडीवर;
मोकळा राहीन फिरत रस्त्यावर.
ऐका प्रभो या गरीबाची प्रार्थना;
कारण तोच आहे एकमेव उपाय
गुलाम-गिरीतून मी मुक्त होण्याचा
नित्या स्वार्थी जनानां धडा शिकविण्याचा !"

□ □

## ८४. गरीब खरंच अनुग्रहित आहेत ?

"कोण आहेत या जगात
ईशकृपाप्राप्त भाग्यवंत ?
गरीब कि श्रीमंत ?"
गरीबच आहेत अनुग्रहित,
असं म्हटलं जातं खरं;
पण ते कसं नि कितपत
खरं असतं बरं ?

चापट झालेले पोटाचे गोळे,
आशाळभूत नजरांनी भरलेले डोळे

मन काही बाही ही गिळायला अधीर,
उन, पाऊस, थंडी, वाऱ्याला उघडं शरीर,
असलं लाचारीचं जिणं
दीनदुबळ्या गोरगरीबांच !
हीच काय ती लक्षणं कृपाप्रसाद पावल्यांची ?

आडव्या फांद्यानी उभ्या केलेल्या भिंती,
छतावर गवताच्या पेंढ्यांचा पसारा
असा घर नावाचा निवारा !
त्यात वास करतात,
खिन्न चेहऱ्यांची पिंजारलेल्या केसांची
छिन्न वस्त्रांनी अंग झाकलेली -
आशाळभूत नजरांची - बायका पोरं !
"ईश्वरी कृपेचा वर्षाव झालेली -
हीच ती जागा."
असं म्हणता तरी येईल ?

ते जगतात भाकरीच्या तुकड्यांवर;
अन्नाच्या एक एक कणाकरिता,
संघर्ष करतात आयुष्यभर !
जातात एकदाचे जग सोडून,
कण कण अन्नाला मोताद होऊन !
बिच्चारे !
जणूं हिवाळी अरण्यात
कुडकुडत अडकलेले पक्षी !
त्यांच्या खात्यात जमा आहे
देवाची तथाकथित सेवा (?) -
करणाऱ्या स्तुतीपाठकांची
तोंडदेखली वाखाणणी,
नि अनुग्रह करणाऱ्यांचा कृपा प्रसाद !
त्यानी आपलं असंच रहाव गरीबीत जगत -

- खात्यातल्या त्या जमेच्या जोरावर;
नि प्रशंसक नि वरदहस्तक मात्र
आपसात चूर चैन लुटण्यात -
या सुखोपभोगाच्या जगात !!

□ □

## ८९. अस्वस्थ मन

"कशामुळं आहे मी अस्वस्थ ?"
माझा मलाच करतोय मी प्रश्न !
मन जड झालंय,
खिळखिळं झालं काळीज;
थोपली गेलीय विचारधारा.
ज्या सिंहासनावर बसून
राज्य करायचं सौख्यानं,
ते बळकावलंय औदासिन्यानं !

मनाच्या तावदानातून -
दिसणारे हे हिवाळी आकाश,
जणूं ताज्या वाऱ्यामुळं -
तरतरी आल्याप्रमाणं -
निरभ्र नि गर्द निळं
दिसत असलं तरी,
औदासिन्याचे घनदाट काळे ढग -
भासतायत आतल्या आत विखुरलेले !
हे अस्वस्थ मन म्हणजे ....
आपल्या मरणासन्न जोडीदाराची
प्राणज्योत मालवत असताना

असहाय्यपणे पहात
घिरट्या घालीत असलेला पक्षी !

दीर्घ कालच्या पश्चात्ताप दग्ध तपश्चर्येनंतर
झाडाझुडपामध्ये, फांद्या, पाना फुलामध्ये
सरोवर, लाटा, नि माशांमध्ये
सर्वत्र आसमंतात,
काळाच्या पाऊलाच्या चाहूलीची
नि क्षणभंगुरतेची अनुभूती घेणारा
एखादा वैरागीच !
आपल्या राजकुमारांची नातलगांची नि सैनिकांची
रक्तरंजित, छिन्न भिन्न प्रेतं,
विखरुन अस्ताव्यस्त पडलीत
अशा रणभूमीवर
सुन्नपणं एकला बसलेला
एक वृध्द राजाच !

अश्रू आटलेले !
सर्व रितं निरर्थक;
मन निकामी ! विचारशक्ती कूचकामी !
जायचं तरी कुठं ?
करायचं तरी काय ?
अशा संभ्रमात मी !

□ □

## ८६. रे माझ्या मना

रे मना !
कुठवर नेणार आहेस तू मला

प्रकाशरहित वाटांच्या या दमट गुहेतून ?
कुठवर चालणार असंच,
आतल्या आत रखडत खोल जाणं ?

एकाकीपणाचा निचरा साचलेल्या -
नि भुताखेतानी झपाटलेल्या खडकावर
नैराश्याच्या दलदलीनं वेढलेला -
अंधुक प्रकाश
संथपणं चाललाय सरत !
पसरट होत !
स्तब्ध झालाय वारा
सुन्न झालीय हवा
क्षीण होत चाललयं
माझ्यातलं चैतन्य.
आहे का याला कुठं तरी अंत ?

माझ्या मना ......
ही जर असेल गुहा
न संपणारी विमनस्कतेची,
तर मग सांग मला
कशाला नेतोयस तू फरफटत मला तिच्यात
किंवा .... हाय ! ..... कदाचित .......
मीच घसरतोयं असहायपणं !

ठाम विचारत नाहीत -
टिकू शकणारे.
सांत्वनापर शब्दही नाहीत -
- दिलासा देणारे !
तत्वशास्त्र चाललीत सारी फिकी पडत
कसलाच आवाज नाहीये उठत !
माझ्या अंतर्बाह्यात सर्वत्र रितेपणाचं साम्राज्य

शून्य ! फक्त शून्य !
शून्य विस्तारुन पसरलेलं निरंतर !

कदाचित हेच असलं पाहिजे
कालातीत सत्य !!

## ८७. पुण्य नगरी

ही आहे पुण्य नगरी
कारण ती वसलीय गंगा किनारी.
आपल्या इहलोकीची यात्रा
संपवतात हिच्याच घाटावर
रोज हजारो लोक !
राख जाते त्यांच्या पापांची
बंगालच्या उपसागरात;
नि आत्मा पोहोचतो थेट स्वर्गात,
वहात असल्यामुळे गंगेच्या पवित्र प्रवाहात !
माणूस खातो-पितो
दंग होतो नाच रंगात,
चंगळवादाच्या नादात !
क्षण अंतिम येईपर्यंत
नाही पडत चिंतेच्या फंदात -
नसते त्याला कशाची ददात.

शेवटी येतो माणूस या पावन नगरी,
ठेवतो देह गंगा किनारी.
वरदहस्त मैयाचे
नेऊन ठेवतात अलगद
त्याला स्वर्गाच्या दारात !

ही नगरी आहे देवादिकांची.
तो पहा एक पुण्यात्मा !
असेच काही पवित्र शब्द
तोंडातल्या तोंडात पुटपुटतोय;
गंगेच्या नावानं डुबकी घेतोय -
- त्याच्या पारमार्थिकतेच्या जळमटापासून
शुचिर्भूत होण्यासाठी !!
क्षणभरानं तो डोकं वर काढतोय,
नि बिचाऱ्याचा अपेक्षा भंग होतोय !
कारण .......
दुर्गंधी सुटलेला, फुगून तट्ट झालेला
हातातून निसटणारा
एका प्रेताचा पांढरा फटफटीत हात
येऊन आदळतोय -
त्याच्या पवित्र हनुवटीवर
तिच्याशी लगट करीत !!

पुज्य गंगामातेच्या
ममतेच्या छत्रछायेखाली -
पोसलेले गुबगुबीत मासे -
पकतायत ते धीवर,
टोपल्या भरभरुन,
ह्या पुण्यनगरीतील पुण्यात्म्यानां -
ह्या पावन माशांच्या -
पवित्र अन्नानं पोसून,
पुण्य पदरी पाडून घेण्याकरिता !!

इथं आहे एक मंदीर त्रैलोक्यनाथाचं.
ठेवलं पाऊल तिथं नि पाहिलं आत
तर दिसतील बसलेले ओळीनं एकत्र,

गरीब श्रीमंत नि ज्ञानी पंडित
आळवणी करीत देवाची -
धन-धान्य नि लौकिक प्राप्तीसाठी.

"हे त्रिभूवनस्वामी,
भक्ती भावानं अर्पिलेल्या
या कपर्दिकेचा स्वीकार कर.
त्रैलोक्यनाथा, प्रसन्न हो;
तुझ्या सानिध्यात राहण्याकरिता,
जागा मला बहाल कर.
एक पुत्र दे वंशवृध्दीसाठी.
धनदौलत दे चरितार्थासाठी,
वर दे प्रतिस्पर्ध्यावर विजयप्राप्तीसाठी.

दयाघन देवा,
ही दुनिया झालीय भ्रष्ट.
म्हणून एकदा का मी आलो -
शंभरीच्या उंबरठ्यावर,
कि तात्काळ धावून ये प्रभो -
- या दुनियेतून मला उचलून
तुझ्या देवलोकात नेण्यासाठी !!"
अशी आर्त प्रार्थना करतायत ते अहोरात्र !

□

## ८८. हसण्या-खिदळण्यात रमलेली प्रीती

प्रीती !
मनाच्या पवित्र मानस सरोवरात
तरणारं मंदसुगंधयुक्त

सुकोमल कमळ !
प्रीती !
अंतरात्म्याच्या अस्तित्वाच्या हिमगिरीतला
शुभ्र नि शीतल चांदणं ल्यालेला चंद्र !
प्रीती !
उंच आकाशात
अथवा हृदयाच्या नील पोकळीत
मोरपीसाप्रमाणं हळूवार विहरणारा
कापसासारखा मऊ मऊ ढग !

निरभ्र आकाशासारख्या
स्वच्छ निथळ पाण्यात
इतस्तत: स्वच्छंद बागडणाऱ्या सोनेरी माशाकडे
भरल्या डोळ्यानी तासन्तास
एकटक पहात बसलेली चिमुकुली पोर
जणू असते विहरत
कालातीत अस्तित्वाच्या महासागरात
तिचा चेहरा असतो फुललेला -
- अहंमन्यतेपासून मुक्त प्रीतीनं !
अहाहा !
इथंच वावरत असावा नक्की,
एखाद्या आईनस्टाईनचा आत्मा,
काळ-अंतराळ नि निरंतरतेच्या-विश्वात !
प्रीतीच्या साम्राज्यांतं
दोलायमान होतो काळ;
गडबडून जातं अंतराळ
डावा-उजवा, वर-खाली,
नि भूत-भविष्यादि बनतात

अस्तित्वाच्या दृष्टीनं अर्थहीन !
शास्त्रज्ञाचा सुबुध्द आत्माही
हिमासारखा जातो वितळून अस्तित्वात !
अस्तित्वावरचा त्याचा व्यामोह
त्यालाच करतो पुरता नामोहरम !

स्वत:वरच नि:सीम प्रेम करणारा,
ब्रह्मांडाच्या गळ्यातला ताईत,
असा ज्ञानी संत
''मी'' नि ''दुसरा'' याना पृथक् करणाऱ्या
''आ'' वासून राहिलेल्या पाताळाला व्यापून
अनंत पोकळीत असतो अचेतन पहुडलेला !
तो प्रीती करतो
नि प्रीतीविषय बनून जातो !
विस्मृतीत जातं त्याचं आत्मस्वरुप
नि तो बनतो ब्रह्मस्वरुप !
अशारीतीनं तो अंतरतो
''एक प्रीती करणारा'' या संज्ञेला !

तो डरतो,
केवळ एका मंदहास्याच्या स्वरुपात !
एक अर्थहीन मंदहास्य !!

हिरवळीनं नटलेल्या टेकडीवर
चिवचिवत उडणारी चिमणी,
सोनेरी प्रभेनं व्याप्त सूर्यास्त;
चहूंकडून ताऱ्यांच्या चमचमाटाची सुखात;
त्यातच एखादा उल्कापात ताऱ्याच्या रुपात !
मग काळोखासंगे रात्रीच आगमन;
सर्वत्र नीरव शांतता !

सर्वत्र प्रीतीचं साम्राज्य ! प्रीतीचा खेळ !
स्वच्छंद बागडते प्रीती !!
प्रीतीला वाटतं मनापासून
की कुणीतरी करावी आपल्यावर
भरभरुन प्रीती !
नि मग होऊन जाव आपण
शून्यात विलीन !!

## ८९. गाठभेट

परस्पर गाठीभेटी घडण्याचं
स्थान आहे हे पृथ्वीतल !
पूर्व जाऊन मिळते पश्चिमेला
तशी उत्तर मिळते दक्षिणेला;
वरचं खाली नि खालचं वर;
हे चक्र चालू आहे आजवर,
कधी काळी भेटण्याच्या आशेवर !

चांगलं नि वाईट,
उच्च व नीच
लहान नि मोठे
यांची चालू असते वर्दळ -
इथं, परस्पर भेटीकरता,
जिथं जड भेटतं चैतन्याला !

शहाणपणाचा होतो उद्‌गम
मूढ पणातूनच !
जीवनातून येतं मरण,

नि मरणातूनच फुलत असतं जीवन !
धडपडत जातो पळत, जोरात-
गाठायला शिखर उद्दिष्टांचं,
येतो घरंगळत कालांतरानं
खाली खोल दरीत !

टाकली एक नजर इकडं तिकडं
तर दिसतील चाललेल्या गाठीभेटी सगळीकडं !
या भेटीतून उमटतात सूर
कधी दुःखाचे, कधी सुखाचे -
कधी समाधानाचे, कधी भक्तीभावाचे !

मीलन होतं आत्म्याचं परमात्म्याशी
जगाचं जीवनाशी !!

□ □

## ९०. विविधाकार

वस्तू !
म्हणजे मानवी मनाला राहिलंय कोडं !
प्रकांड पंडिताच्या पंडित्याचा आरसाही
आहे पुरता तडकलेला !
त्यातून प्रतिबिंबित होतं
मोडकं तोडकं तुटपुंजं पांडित्य !

एखाद्या पर्वताला जर केलं गतीमान
नि गती जर झाली दोलायमान,
तर गदगदु लागेल
त्याच्या आसमंतातलं रान !

ती (वस्तु) असू शकेल -
कोस दोन कोसभर ऊंच,

किंवा नसेल तिला उंचीच काही !
ती असू शकेल अनेक योजने लांब
किंवा काही इंचभरही
किंवा नसेल टिचभरही !
असेल कदाचित तरुण वा वृध्द
अथवा नसेल अजूनी जन्मलेली !
तिच्यावर स्वार व्हायच्या प्रयत्नानिशी
ती होईल दिसेनाशी !

ती घनरुपी असावी ?
कि परमाणूंचा एक गोळा ?
जसा मधमाशांचा पोळा ?
अथवा उत्स्फूर्त उत्साह
सुप्त शक्तिने युक्त असा ?

असं म्हणतात की
हिला आहेत अकरा विभाग !
मनाला वाटतं .....
असावेत कदाचित याही पेक्षा जास्त !
कदाचित वस्तुचं करायला मोजमाप
मनच तिथं जागेवर नसाव !
कदाचित मनालाच आकाराचं मोजमाप नसावं !
या साऱ्या उलट सुलट विचारानी
मला पुरतं गोंधळात टाकलय !

□ □

## ९१. परमात्मा माझा आत्मा

असं म्हणतात की
"मी" म्हणजे आहे फक्त
हाडे, मांस, मेंदु

रक्त, त्वचा, मज्जातंतु !
जगतात यांच्या जोरावर कृमी अळ्या;
करतात रसायनं यांच्यावर प्रक्रिया.
परिणामी हे सडतं, कुजतं;
बनतं द्रवरुप, सुटते दुर्गंधी.
जातं वाहून भिजवत आजुबाजूची धरती !

''मी'' हा मनाला होणारा आभास !
मनातला ग्रह, मनातली आस !
हे सारे .........
सागरी लाटाप्रमाणं
नभातल्या ढगाप्रमाणं
नि माळरानातल्या जंगली फुलांप्रमाणं
उद्भवतात, दृष्टी पथात येतात,
भुईसपाट होतात, घरंगळतात,
उसळतात नि
जातात निघून मुंगीच्या पावलानं.
काळ यांच्याशी भांडतो खेळ
ना तर यांच्या टिकणाऱ्या रंगछटा
ना निश्चित आकाराचा मेळ !
मूळातच अर्थहीन हालचालीनं
चालला असतो सतत त्यांचा खेळ !
अशा ढंगातले ते म्हणजेच तुम्ही
असं मानायची आहे काय तयारी तुमच्या मनाची ?
द्या त्याना झटकून;
सुटा त्यांच्या मगरमिठीतून;
या बाहेर उसळी मारुन.
तुम्ही उभे ठाकाल,
केवळ काळातीतच नव्हे,
तर अनंतही बनून !

अशा रीतीनं तुम्ही बनता
सर्व समावेशक ''तो'', ''ती'', ''ते''
नि स्वत:ला संबोधू शकता
माझं हे स्वरुप
परमात्म्याशी अनुरुप

 

## १२. आहे कशाचं ज्ञान मला ?

कसला हा गोंधळ
माझ्या भोवतालच्या जगात ?
कुठं खळखळ प्रवाह
कुठं सूंसूं गोंगाट
कशाची तरी चाललीय वृध्दी
कशाचा क्षय !
कुठं प्रकाशाची झलक
कुठं वेगाची धडक !
कुठं आरोहण, कुठं पतन !
येतात वस्तू दृष्टी पथात
माहीत नाही कुठून !
रंगरुप बदलत बदलत
जातात निघून !
लक्षावधी उत्तेजना
क्षणोक्षणी आदळतायत येऊन
माझ्या ज्ञानतंतुवर
गोड नि कटू भावनांच्या सोबतीनं

शब्द, स्पर्श, रस, रुप, गंध,
देतायत झलक विद्युल्लतेप्रमाणं !
आतल्या आत कुणा अज्ञाताला
होतो बोध या घटनांचा;
नि आठवतो तो त्याना,
नि करतो उजळणी त्यांची !
कार्यान्वित होते त्याची विचारशक्ती,
जागृत होते ईच्छाशक्ती;
वावरतो तो कल्पनांच्या जगात.
सरमिसळतात त्याच्या अंतर्मनात -
विज्ञान, तत्वज्ञान, नीतीमत्तादींचे विचारप्रवाह !
"काय असावं बरं हे सारं,"
विचार करता मनी,
मिळत नाहीये धागा कुठं मला,
अंधारात चाचपडतोय मी !

वाटतं मला आहे ज्ञान साऱ्याचं;
म्हणजे कशाच ?
माझं मलाच राहिलय कोडं याचं !!

□ □

## ९३. शिमगा

मूळच्या उपजत स्वभावाला -
वाट मोकळी करणारा -
एक अभूतपूर्व सण ! होलिकोत्सव !
ज्या क्षणी पडतात तुटून,

संयमन कि संकोचाचे बंध,
त्या क्षणी, सण साजरा करण्याची
होते सुरवात तडाखेबंद !!
गाण्यांत नाच रंगात माणूस होतो दंग,
नि उधळू लागतो मनसोक्त उल्हासाचे रंग !

औपचारिकतेच्या सोंगाचा
होतो पडतेफरास !
उघडा नागडा माणूस
पराकोटीचा अत्युत्साह संचारलेला !

फाटके, गबाळे, मळलेले कपडे;
धुळीनं माखल्यामुळं,
घाणेरडं दिसणारं मुखकमल !
सौंदर्याचे झालेले तीन-तेरा
मागोमाग कुरुपतेनं
धरलेला चेहऱ्याभोवती फेरा.
अशा अभूतपूर्व मन:स्थितीत
सुखदु:खानं लेपलेल्या भिंतीनी,
उभारलेलं संस्कृतीचं मंदीर,
कोलमडून पडलेलं !
केवळ हर्षोल्हास मात्र मागे राहिलेला शाबूत
नसानसातून वाहणारा !

माणसातला माणूस जातो संपून,
तो राहाते फक्त "वरदानंद" म्हणून,
जगतो अनंत राहून !
म्हणून तर साजरा करायचा हा शिमग्याचा सण !!

❑ ❑

## ९४. उष्मा

मला स्पष्ट दिसतंय या खिडकीतून,
रखरखत्या उन्हानं
तप्त झालेल्या जमीनीतून,
येऊ लागल्यात उष्णतेच्या लाटा उफाळून;
पेटत्या ज्वालेप्रमाणं
हळूहळू सरकतायत वर वर;
मधून मधून होणाऱ्या -
वाऱ्याच्या माऱ्यानं,
उष्ण लाटांच्या लालसर पांढऱ्या जिभल्या -
सपकन् घुसतायत आत;
लाही लाही करतायत माझ्या अंगाची.

जीवन जगण्यापायी
नि यशाची पायरी गाठण्यापायी
होणाऱ्या घालमेलीचं
एक ज्वलंत प्रतीक ही त्वचा ....
तडफडते, अश्रू ढाळते घामाचे !

काही लीटर पाणी
माझ्या नसांत शिरलंय
घेतलं जाणार आहे ते परत शोषून -
उष्णतेची दासी असलेल्या हवेकडून !
ओ हो ! हा काय मधेच -
एकतोय मी कसलातरी आवाज,
येऊ घातलाय माझ्या मेंदूतून !
हाय रे दैवा ! मला होतोय भास -
माझा मेंदूच चाललाय विरघळून;

बनू लागलाय विचारशून्य !
दृढ आत्माही चाललाय पाठोपाठ
विरत विरत अनंतात -
जिथं नाही पोंचू शकत
ही जीवघेणी उष्णता, नि कडाक्याची थंडी.

❑ ❑

## ९८. आत्म निरीक्षण

माणसं करीत असतात -
सारखी धावपळ नि धडपड
आपल्या अंतरंगाचं इंगित जाणून घेण्याकरिता
जे आहे दडलेलं
पण नाही लपलेलं !

स्वत:लाच प्रश्न करतात
"मी कोण ?"
नि धाव घेतात उत्तरासाठी
पुस्तकांच्या संग्रहालयात.
सगळ्या पुस्तकांचा एकच सूर
"आत्मा आहे असाच काही
अर्थबोधापासून दूर;
शब्दानी कळू शकणार नाही त्याचा नूर !"
ते धाव घेतात मग
तज्ज्ञ तत्वज्ञांकडं -
जे आयुष्यभर करीत असतात काम, -
आत्म्याविषयी बोलण्याचं !

पण ते जे बोलतात
त्याचा प्राय: बोध होत नाहीं
जाणू ईच्छिणाऱ्याला;
आत्म्याविषयी अशा संदिग्ध उत्तरानी
गोंधळलेले असमाधानी असे ते
आता हताशपणं वळतात -
आत्मविरहित जगाकडं -
जाऊन पोचतात खूप खोल -
जिथं भोगेंद्रियांचा असतो मुक्त संचार;
जिथं मन जातं रमून
मुक्त आनंदात, इंद्रिय सुखात
नि वंचित होतात ते आत्मस्वरुपाला
माणूस जेव्हा इतर साऱ्यापासून पुरेपूर
नेहमी राहतो चार हात दूर,
तेव्हा त्याचा तोच असतो "आत्मस्वरुपात" चूर !

## ९६. आत्मा

शेकड्यानी नव्हे -
हजारोच्या संख्येनं गुंतलेत लोक
आत्म्याच्या शोधात -
पूर्वीपासून आजतागायत !

डोक्यात घेवून या शोधाचं खूळ
त्यानी त्याग केला घरादारांचा
खेडोपाडी, गावो-गावी वस्त्या केल्या,

नि जाऊन राहिले दऱ्या खोऱ्यात आश्रयाला
करीत राहिले पुजा-अर्चा जन्मभर
स्वत:च्याच आत्म्याच्या शोधापायी !

बरीच बुध्दी वाया गेलीय त्याच्या शोधात;
लाखो तास घालवलेत त्यानी,
आत्म्यासंबंधी चर्चेच्या फंदात;
छापले गेलेत ग्रंथावर ग्रंथ;
प्रतिदिनी होत आलय पारायण श्लोकांच;
चालू असतो त्याच्या नामाचा जप,
अखंड नि अथक
थक्क होतो मी -
हवा कशाला एवढा आटापिटा ?
कशाला एवढा गाजावाजा ?
आहे का गरज आत्म्याला शोधायची ?
तो म्हणजे नव्हे काय तुम्ही ?
उत्तर जर असेल होकारार्थी
तर कशाला उगाच त्रागा ?
नि असलं जरी नकारार्थी
तरीही गरजच काय
त्राग्याला ठेवायची जागा ?

❑ ❑

## ९७. चर्पटपंजरी

स्तुती केली पाहिजे आपण देवाची तोंडभरुन;
कारण त्यानं आपल्याला जन्माला घातलंय
प्राण्यातल्या बोलू शकणाऱ्या

मनुष्य प्राण्याच्या पोटी !
बोलतच राहतो आपण आयुष्यभर
कुणाना कुणाशी तरी,
नि नसेल कुणी, तर स्वत:शीतरी !

शब्द पडतात पटपट बाहेर हृदयावाटे तोंडातून
जणू इवलेसे पक्षी, पटपट बाहेर पडणारे,
झाडाच्या बुंध्यात थाटलेल्या घरट्यातून !

श्रवणेंद्रियांच्या माध्यमानं
शब्द लागतात, किती गोड, किती मोहक ?
रसनेवरुन सरकत निसटणारे -
शाहजोगपणाचा मुलामा दिलेले !
साखरेची पेरणी केलेले !!
केवळ शब्दांच्या सुखसोहळ्यांचा
आनंद लुटण्यापायी तर
माणूस चालू ठेवतो सतत मोकळी
आपल्या तोंडाची टकळी !

पुष्कळदा, किंबहुना, बहुतेकदा -
काहीच राम नसतो
आपण उच्चारीत असलेल्या शब्दात.
त्यांच्यातून होत नाही,
ध्वनित काहीही अर्थ;
ते कानाला लागतात गोड !
केवळ बोलायचं म्हणून बोललेल्या
अशा शब्दांच्या योग्य मांडणीची
जोड देण्याचा शोध घेण्यासाठी
मानवी ज्ञान शक्तीला आवाहन करतात शब्द !

"गोल मेज" हा शब्द पडतो तोंडावाटून बाहेर,
नि लगेच गोल गोल फिरु लागतं मन
अशा एका मेजाच्या कल्पनेनं !
एक अस्पष्ट मेज साकारतो मनात नि होतो नाहीसा
त्रागा करीत असतं मन -
"असा एक परिपूर्ण गोल मेज
असू शकतो काय ?"

बोलत बसायचं म्हणजे
निरुद्योगी मनाला
मिळालेलं छानपैकी काम !
"अनंत ब्रह्मांड !"
एक अगडबंब शब्द उच्चारतो आपण,
नि चालना मिळते मनाला
नि चालू होतो प्रवास त्याचा,
शून्याच्या टोका टोकातून ,
थांबतं येऊन कशाभोवती तरी घोटाळून;
येतं बाहेर झटका देऊन त्या अडकणीला;
दूर सारण्या करिता सारे अडथळे
अनंत होण्याच्या मार्गातले
येऊन थांबतं ते क्षणभर
नि हे अनंत नाही असं समजूनच की काय
झटक्यानं निघतं पुढं
अनंततेच्या टोकाच्या शोधात !
मनाला लाभलेला हा एक करमणुकीचा खेळच !
थकलं, भागलं, वैतागलेले मन
या विचारावर येतं की
अनंतता ! एक शब्दश: अद्‌भूत सत्य !!

## ९८. खुळा

आपण सगळे आहोत मूळातच खुळे
त्यातलेच एक तुम्हीही !
हे मानायला मात्र तुम्ही करता अनमान
यास्तव हे पक्कं झालं बरं
कि माझं म्हणणं नि:संदेह खरं !

करा तुमचे डोळे बंद;
तुम्ही होता तात्पुरते अंध !
टाका तुमच्या हृदयावर पडदा
वेडेपिसे तुम्ही होता !!
या ना त्या गोष्टीला आपल्या हृदयात
नेहमीच असतो प्रवेश बंद !
एखाद्याच्या हृदयाचा जगाशी -
असतो जवळचा संबंध
दुसऱ्या एखाद्याच्या हृदयाचे
जुडतात देवाशी आत्मिक बंध
"बंद" ची क्रिया म्हटलं की
दरवाजा आलाच,
भोवताली भिंतीही आल्याच !
खड्या कुणी केल्यात ह्या भिंती ?
कुणी करुन टाकलंय
आपल्याला इतकं आंधळं
की आपल्याला एवढंही उमगू नये
की आपल्या अंतर्मनातही
आहेत जागोजाग भिंती ?
जाती, उपजाती, लिंगभेद -
वर्ग, प्रदेश, वर्ण भेद
अशा एक ना दोन -

शेकडो प्रकारच्या खुळांनी
घर केलंय आपल्या मनात !
एकाच वेळी एकाच दमात !!

हे फूल आहे शहाणं
हे रोपटं आहे समंजस
हा छोटा ओढाही आहे समजूतदार
हा सूर्य, हा चंद्र, आणि सारे तारे
एक माणूस सोडला तर,
कुणी ही नाहीत खुळे.
कारण माणसाचा झालाय गैरसमज,
कि तो स्वत: आहे अति समंजस !

''जीवो त्क्रांतीतत्वाचा मुकुटमणीच मी''
असं स्वत:ला समजतो हा दीडशहाणा !
जसा एखादा अणू
हिमालयाच्या शिखरावर, कुठं तरी उडणारा
समजतो स्वत:ला, जगातला सर्वोच्च, सर्वश्रेष्ठ !
माणसाच्या मनात पक्का रुजलाय भ्रम
स्वत: सर्वश्रेष्ठ असल्याचा !
या मूढ कल्पनेनं
तो जातो पुरता पिसाटून;
तो ''तो स्वत:'',
या स्थितीला मुकून जातो;
''सर्व काही मी'' असं मानू लागतो
आत्मस्वरुपाचाच त्याला विसर पडतो !
छोट्या मोठ्या कुणालाही
तिळमात्र नसतो संदेह
आत्मस्वरुपाच्या अस्तित्वाचा !
आत्मस्वरुप म्हणजे तर स्व-अस्तित्व !
ते जगत आलय

नि उपभोगत आलय प्रत्येक क्षणाचा आनंद
मनात न बाळगता कसलीही स्वप्ने !

पण माणूस नावाचा हा प्राणी
निघालाय "स्वत:" च्याच शोधात,
स्वत:चं अस्तित्व हुडकून काढण्याकरिता !

त्या प्रीत्यर्थ
तो उपास तापास करतो,
शरीरावयांची आहुती देतो;
जप-तप, होम-हवन, करतो;
मानवी रुपाकाराच्या -
दगडी मूर्तिंभोवती -
अनंत प्रदक्षिणा घालतो !
डोंगर टेकड्या चढून जातो,
दऱ्याखोऱ्यातून फिरतो,
गुहेत बसतो;
नि असाच काहीबाही करीत राहतो
असंख्य असंबध्द मुर्खपणाच्या गोष्टी !!
माणूसच तो !
कसा होणार तयार
मूर्ख म्हणवून घ्यायला ?
तो वावरतच नाही
"वर्तमान" च्या सुवर्ण क्षणांत
तो जगत असतो
भूतकाळ आठवीत
नि भविष्य काळ रंगवीत
जे अस्तित्वातच नाहीत !
वर्तमानरुपी गुळाची चवच माहीत नाही
या मानवरुपी गाढवाला !

□ □

## ९९. उपहार

जीवन एक लाभलेला अमुल्य नजराणा !
हे जगही आहे एक नजराणाच
मानवाला उपलब्ध झालेला !
तो अर्पण करणारा
नि कुणीतरी त्याचा स्वीकार करणारा
असा बोटानं दाखविण्याजोगा
कुणीच नाही प्रत्यक्ष !
पण आहे निश्चित्
फक्त उपहाराच्या स्वरुपात !

मेघाचं बरसणं,
झाडाचं फुलणं,
नद्याचं वाहणं,
ह्या आहेत देऊ केलेल्या सहजसुंदर नैसर्गिक कृती !
मेघाना बरसवतो कोण ?
झाडांना फुलवतो कोण ?
कोण वाहवतो नद्यांना ?
प्रयत्न केला याचा घेण्याचा शोध
तर होईल केवळ हालचालीचा बोध !
न दिसेल हालचाल करणारा
न ही दिसेल हालचाल करुन घेणारा
दिसणार ती फक्त हालचाल !
म्हणतो माणूस !
''प्रकृती मला करते बहाल
जीवन मन नि दृष्टी,
त्यात सम्मिलित करतो मी

सुख-स्वारस्याची सृष्टी !''
कुठंय ही प्रकृती -
नि कुठंय तो ''मी'' ?
उपहाराच्या एकमेव स्वरुपाव्यतिरिक्त
औषधालाही नाहीत ते कुठंही !
बनून रहावं एक शुध्द उपहार म्हणून
अमक्या तमक्या कुणालाही,
कुणाकरिताही नसलेला असा !
केवळ एक निव्वळ उपहार !

निर्झर बनायचं
नि झुळझुळण्याचा आनंद लुटायचा !
तिथं असू द्यायची
केवळ आनंदाची लयलूट !
आनंद देणारा नि उपभोगणारा
असे कुणी नसलेली
एकमेव अशी लयलूट !

 

## १००. वेध घेणाऱ्याचा थांबतो शोध

घरदार सोडून बाहेर पडला तो
दिव्यत्वाच्या शोधात -
ह्या विचारातच की -
असलंच पाहिजे ते कुठंतरी जगात !

धुरंधर गुरुजनाना भेटला तो.
दिव्यत्व त्यांच्या हृदयात -
वास करीत असल्याचं जाणवलं त्याला.

हर्षभरे मनोभावे
त्यानं केली त्यांची सेवा.
प्रचंड गर्जना करीत अंगावर येणाऱ्या -
- जीवनसागरातल्या उंच अनावर लाटानाही -
हसतमुखानं तोंड देणाऱ्या -
त्या महामानवांच्या -
प्रसन्न हंसऱ्या चित्तवृत्तीचं,
आयुष्यभर तो करीत राहिला कौतुक.
त्यांची दृष्टी शांत विशाल असल्याचा -
साक्षात्कार झाला त्या शोधकाला.
परमोच्च दिव्यत्वाच्या पाऊलांची
चाहूल लागली त्याला, त्यांच्या सान्निध्यात !
हवं हवसं वाटत होतं त्याला -
त्याचं मुग्ध हास्य;
हेवा वाटत असे त्याला,
त्यांच्या गाढ, उत्कट धर्मनिष्ठेचा !

वर्षामागून वर्ष सरली भूतकाळात
त्याचा 'अहं'' निमाला
गर्वाचं घर झालं खाली.
दृढ आकांक्षानी भरलेलं त्याचं हृदय
झालं शांत नि स्वस्थ.
बोथट झाली,
त्याच्या आशा अभिलाषांची धार.
आता तो झाला पात्र नि झाला सज्ज,
नि घेऊ लागला हळूवारपणें प्रवेश -
शांत, स्तब्ध दिव्यत्वाच्या
अपरिमित गहनतेत !

 

# १०१. उपनिषद

''उपनिषद'' हे नामाभिधान पावलेले
विद्वत्ता नि उपदेशानं भरलेले
छोटे छोटे ग्रंथ म्हणजे,
दिव्य साक्षात्काराच्या अनुषंगानं
प्राचीन काळच्या महान ऋषी मुनींनी -
स्वर बध्द केलेली श्रवणीय कवनेच -
जी युगानुयुगे,
गायिली जात आहेत,
जशीच्या तशी,
आत्म्याच्या सुख-शांती-समाधानासाठी.

हे ग्रंथ जे कथन करतात-
त्या काही भाकड कथा नव्हेत गतकाळात घडलेल्या
अथवा नव्हेत साहसकथा, भुताखेतांच्या.
ते सांगतात कथा अशा,
ज्या बसत नाहीत,
काळ नि अवकाश यांच्या परंपरेत.
ते ओळख करुन देतात अशा ठाम हकीकतींची
ज्या बसत नाहीत
तर्कशास्त्राच्या तकलादू साचात !

जे अंत:करणाला उमगतय त्या बद्दल
जे जे आहे सुंदर त्याबद्दल
ब्रह्मानंद प्रदान करणाऱ्या उत्कट भाव-भावनाबद्दल
नि साध्या सरल सत्याबद्दल -
वर्णन करायला नि ठामपणं सांगायला
जिथं मानवी भाषा होते असमर्थ -
तिथं लीलया उलगडून सांगतात हे ग्रंथ समर्थ.

विशाल निळ्या आकाशात संथपणं विहरणारा
पिंजलेल्या पांढऱ्या शुभ्र -
मऊ मऊ कापसाच्या रुपाचा एखादा ढग
या नि अशा नितांत सुंदर दृश्यांत
साक्षात्कार झाला ऋषीमुनीना
अमर्याद स्वरुपाच्या परमसत्याचा;
नि त्याना लागली परमोच्चानंदाची तंद्री !
अन् त्यांच्या खोल हृदयातून
सुरु झाला ओघ अमोघ
पावन सहजोद्‌गारांचा, शब्दांचा;
एकत्र आणले गेले
नि गुंफले गेले ते शब्द -
नि त्यांची बनली ही उपनिषदें !

 

## १०२. मौनव्रत

वारा नसलेल्या स्वच्छ आकाशात
स्थिरावलेला एकुलता एक ढग
दिसतो दिव्य नि लोभसवाणा.
सोनेरी किरणधुलीनी
नखशिखांत माखला गेलेला तो
दिसतो मोहक राजबिंडा !

मऊ मऊ कापसासारख्या -
या स्वप्नील ढगाच्या -
पार पलीकडे पसरलाय,
काळा निळा अनंत नभसागर !

सूर्य नाही नि चंद्रही नाही,
एकही तारा अजूनी उगवलेला नाही;
शांततारुपी रजईचा बिछाना करुन,
चिरशांतीचा ढग हृदयात सामावून घेऊन,
मी पहुडलो पाठमोरा अकाशाकडे पहात,
भोवतालच्या जगाला पुरता विसरुन !

मनानंच मी गेलो वाढत वाढत नि पसरत
नि संपूर्ण अवकाशाला टाकलं घेरुन !
सर्व स्थिरसथावर - हालचाल रहित
मी जगत होतो एकटाच, जागृत राहून !
केवळ एकला, एकसारखा !

माझ्या अस्तित्वाच्या महासागरात
विहरत होता माझा "अहं" !

 

## १०३. संत

संत महात्म्यातलाही सर्वश्रेष्ठ
तरी कुणालाच परिचित नसलेला !
तो खातो, पितो, झोपतो;
बोलतो, चालतो, गातो
पण प्रत्यक्ष पाहिलं नाही त्याला कुणी
ऐकीवात नाही, त्याचा आवाज कुणी ऐकल्याचं !
पूर्ण रितं असं आहे त्याचं स्वरुप.
त्याचा तो "अहं" निमालाय बऱ्याच काळापूर्वी;
काळसरिता वाहतेय युगानुयुगे

अवकाशात वळसे घेत घेत
लक्ष्यहीन, दिशाहीन !

विचारप्रवाह वारंवार -
येतायत खाली वाहत त्याच्यातून;
तो करीत नाही प्रतिकार कशाचाच;
मूळातच प्रतिकार करण्यासारखं नाही काही
तो आहे अवतार परिपूर्ण स्तब्धतेचा
चालू आहे त्याची वाचा वर्षानुवर्षं -
अखंडीत नि ! अर्थहीन !
हँसतोय तो स्वत:च्याच विचारधारानां
नि शब्दोच्चारांच्या प्रवाहाला !
गातायत नाचतायत हजारो पक्षी,
किलबिलाट करीत त्याच्या अंवती-भंवती.
अविचलित तो फक्त हंसतो.
ते हास्य राहतं टिकून अक्षय;
त्याचा मात्र होत जातो क्षय
नि विलीन पावतो तो अमरत्वात !

❑ ❑

## १०४. धर्म

धर्माची
काही करतात प्रेमानं कदर
नि काही करतात निर्भर्त्सना ।
पण दोहोंपैकी बहुतांशीना ।
माहित नसतो त्याचा ओनामा !

जे जगतात धर्माचरणानं
ते गुंतत नाहीत चिंता करण्यात,
नि त्याचं वर्णन शब्दानी करण्यात !
सकाळच्या सोनेरी सूर्याकडं
बघत बसतात लहान मुलं
विस्फारलेल्या डोळ्यांनी -
आधाराप्रमाणं
नि खचितच अनुभवतात अद्भूत दृश्य

त्यांच्या मनात साठविलेल्या
त्या अद्भूत दृश्यांचा
वर्णन करण्याच्या फंदात
पडत नाहीत ती !
धर्म म्हणजे -
जिवनाकडे बघण्याची दृष्टी,
सौंदर्याची सृष्टी;
ईश्वरी कृपापात्र कूळ !
ज्याला घ्राणेंद्रिय आहे.
सुगंधाचा मिळेल त्यालाच लाभ.
ज्याला हृदय आहे,
अपूर्व होईल त्यालाच अनुभूती !

धर्म म्हणजे
विश्वाशी असलेलं नातं;
एक घडून येणारं मधूर मीलन -
सुक्ष्माणूंच अमर्यादशी,
आत्म्याचं सत्याशी,
कधीही न संपणारं !!

□ □



## पूज्य श्री. सिद्धेश्वर स्वामीजी

विजापूरच्या श्री. ज्ञानयोगाश्रमाचे पूज्य 'श्री' बालपणींच भगवंताच्या शोधांत, लिंगैक्य वेदांत केसरी श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगी यांच्या सान्निध्यात आले. पू. श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगीश्वरांनी, शिवयोग साधनेबरोबरच, वेद, उपनिषदें, योगसूत्र, भगवद्गीता, वचनशास्त्र इत्यादींच्या ज्ञानाचा अमोल ठेवा श्री सिद्धेश्वरांच्या हाती सुपूर्द केला.

तत्वज्ञान विषयांत एम.ए. पदवी संपादन करून श्री सिद्धेश्वर स्वामीजींनी जगतांतील सर्व धर्मग्रंथांचे सखोल अध्ययन केले. सर्व धर्मकेंद्रांचा अभ्यास केला. गांधीवाद, समाजवाद, भांडवलशाही, लोकशाही, राजशाही इत्यादी सामाजिक व राजकीय विचारधाराही अवगत करून घेतल्या.

निसर्गाविषयीं भगवंतायेवढीच श्रद्धा व प्रेम बाळगणारे 'श्री' अत्यंत साधे, निरागस, विनयशील, मधुर स्वभावाचे! कन्नड, इंग्रजी, मराठी व हिंदी या भाषांचे प्रकांड पंडित असून 'श्री' नी कन्नड व इंग्रजी भाषेंत अनेक ग्रंथांची रचना केली आहे. अनेक पाश्चात्य देशांमध्ये त्यांची व्याख्याने झाली आहेत. 'श्री' च्या प्रवचन माधुर्यांत श्रोत्यांना ब्रम्हानंदाचा अनुभव लाभतो. श्रीं ची प्रवचनें वर्षाचे बाराही महिने कुठेना कुठेतरी चालूच असतात.